****

# Sant Naam Devachi Abhang Gatha

## (Marathi)

****

# संत नामदेवांची अभंगगाथा, विषयानुक्रमणिका

॥ श्रीहरिः ॥

# संपादकीय

**'राही रखुमाई कुरवंड्या करिती। जीवे ओवाळिती नामयासी॥'** संत नामदेवांचे हे भाग्य संत निवृत्तिनाथांनी भरल्या मनाने शब्दबद्ध केले आहे. असे हे संत नामदेव श्री क्षेत्र पंढरीत शके ११९२ मध्ये कार्तिक शुद्ध एकादशीस सूर्योदयाला गोणाईचे उदरी जन्माला आले. **'प्रसवली माता मज मळमूत्री। तेव्हां जिव्हेवरी लिहिले देवे नामदेव।'** जन्मताच ते **'विठ्ठल विठ्ठल विठ्ठल'** म्हणाले.

नामदेवांचे ज्ञात पूर्वज यदुशेट शिंपी रिळे, ता. शिराळा, जि. सांगली, (महाराष्ट्र) येथे राहात. यदुशेटीनंतर हरिशेट, गोपाळशेट, गोविंदशेट, नरहरिशेट व दामाशेट या पिढ्या झाल्या. रिळे येथून मध्यंतरी नरसी येथे त्यांचे स्थलांतर झाले. त्यामुळे त्यांचे आडनाव रेळेकर झाले. सर्व पूर्वज विठ्ठलभक्त होते व नेमाने आषाढी कार्तिकीस पंढरीत येत. नरसीहून दामाशेटी पुत्र प्राप्तीसाठी पंढरीत आले आणि **'गोणाईने नवस केला। देवा पुत्र देई मला।'** तोच हा पुत्र नामदेव. **'नामदेव ऐसें नाम त्वां (देवांनी) ठेविले.'** त्यांना **'छंद विठूचा लागला'** गोणाईने म्हणावे, **'काय पोरा लागली चट। धरी देउळाची वाट॥ हाती वीणा मुखी हरी। गाय राउळा भीतरी॥ नामा म्हणे माळ (देवांनी) घातली स्वहस्ते'** नामदेव वारकरी झाले.

नामदेवकुळाचा शिवणे, टिपणे करावे, तयार कपडे बाजारहाटासी जावे, असा पूर्वापार धंदा होता. दामाशेटी तोच धंदा करत होते. ते देवाला नित्य नैवेद्य अर्पण करत व मगच बाजाराला जात. एकदा पत्नी गोणाईला म्हणाले, **'आम्ही हाटा जाऊ। लवकरी न येऊं। नैवेद्य पाठऊं। नाम्या हातीं॥'** माता गोणाईने नामदेवांचे हाती नैवेद्य दिला व देवाला अर्पण करण्यास सांगितले. नामदेवांनी मोठ्या आनंदात नैवेद्य नेला. देवापुढे ठेवला. **'केशवा माधवा गोविंदा गोपाळा। जेवी तूं कृपाळा पांडुरंगा॥'** ही हात जोडून आर्त प्रार्थना केली. देव भक्ताच्या निर्धाराचा कस पाहातो. देवाने खूप विलंब लावला. नामदेव व्याकूळ झाले. प्राणार्पणास सिद्ध झाले.

देव प्रगट झाले व त्यांनी नैवेद्य ग्रहण केला. **'ऐसी ग्लानी करितां विठ्ठल पावला। नैवेद्य जेविला नामयाचा।'** कृतयुगातील प्रह्लादभक्तीचेच दर्शन कलियुगात नामदेवांनी जगाला घडवले. दामाशेटींनीही दुसऱ्या दिवशी हे प्रत्यक्ष अनुभवले. त्यांना धन्य धन्य वाटले.

नामदेव देवळात जात होते. पायरीवर एक मुलगी आक्रंदत होती. वारीचे दिवस होते. नामदेवांनी कळवळ्याने तिला घरी आणले. तिने आपले नाव जनी, वडिलांचे दमा, आईचे करुंड, गांव गंगाखेड असे सांगितले. हे दांपत्य शूद्र, पण पंढरीला नित्य येई. जनीला विठ्ठलाचे वेडच लागले. ती गावी परतली नाही. नामदेव परिवाराची झाली. त्यांची दासी म्हणे व तसे जगाला सांगे. तिच्या भक्तीसाठी देवही वेडे झाले. तिच्या संगे दळू, कांडू लागले. तिला न्हाऊ घालू लागले. तिला शेणी वेचण्यातही साहाय्य केले. एकदा देव दळण कांडण्यास रात्री आले. वेळ झाला म्हणून घाईने परतले. पदक, माळा तिथेच राहिल्या. जनाईवर चोरीचा आळ आला. सुळी देण्याची शिक्षा झाली. तिथे नेले. या अन्यायाने जनाई पेटून उठल्या. 'देवा, जिवंत आहात का ?' म्हणाल्या. तत्क्षणी सुळाचे पाणी झाले. जनाईंचा उदंड जयजयकार झाला. 'नामदेव जनाबाई भजन' रूढ झाले.

नामदेव चंद्रभागेत स्नानाला व भक्त पुंडलिक-दर्शनार्थ जात. वाल्मीकींनी शतकोटी रामायण रचल्याचा संवाद त्यांच्या कानी आला. त्याचक्षणी देवाच्या शतकोटी अभंगांचा त्यांनी निश्चय केला. 'त्वरा केली प्रति केशिराजे' आणि अपार अभंग प्रगट झाले.

नामदेवांचे लडिवाळ प्रेम, अमृतमधुर अभंग, टाळ, वीणा, मृदंग असा कीर्तनाचा फड उभा झाला. जनसागर लोटला. राऊळ अपुरे झाले. वाळवंटात **पुंडलिकापासी नामा उभा कीर्तनासी।** अठरा पगड जाती भक्तिरसात न्हाल्या. **निवृत्ति ज्ञानदेव सोपान। अपार वैष्णव ते जाण। हरि कीर्तनाची दाटी। तेथे चोखा घाली मिठी॥** चोखा, बंका परिवार, नरहरी, जगमित्र नागा, आसंद सुदामा, विसोबा, सावतोबा, गोरोबा, साऱ्यांची **'एकच टाळी झाली चंद्रभागे वाळवंटी'**

ज्ञानदेवांचा अभंग झाला आणि **अभंग बोलता रंग कीर्तनीं भरला।** **प्रेमाचेनि छंदें** विठ्ठल नाचूं लागला. **नाचू कीर्तनाचे रंगी। ज्ञानदीप लाऊ जगी।।** चे दर्शन झाले. नामदेव टाळी वाजवा म्हणाले. गोरोबांचे नेत्री अश्रू दाटले. त्यांनी आपले थोटे हात वर केले. चमत्कार झाला. '**गोरा थोटे वरती करी। हस्त फुटले वरच्यावरी।।**' त्यांचे दिवंगत मूल रांगत आले. '**कीर्तनी गोरियाप्रती कर आले। मूलही देखिले कीर्तनात।।**' गोरोबांना भडभडून आले. म्हणाले, '**जीवे ओवाळावे नामयासी। जणू नामदेवाच्या कीर्तनी। ध्वजा आल्या स्वर्गाहुनी।**' '**वाळवंटी चंद्रभागेच्या काठी झेंडा रोविला।**' '**ऐसा कीर्तनमहिमा सर्वांमाजी वरिष्ठ। जड मूढ भाविका सोपी केली पायवाट।।**'

नामदेव पार वेडे झाले. दामाजींना व गोणाईंना वाटले, पोर हातचे गेले. लग्नाची बेडी घातली. गोविंदशेट सदावर्तेंची कन्या राजाई नामदेवांची पत्नी झाली. पण नामदेवांचे 'येरे माझ्या मागल्या'च कायम. गोणाई त्यांना कळवळून म्हणाली, '**कापड घेऊनी जाई बाजारासी। गोणाई नाम्यासी शिकवीते।।**' तुझे लग्न झाले. '**कुटुंब चालवणे तुज**' नामदेव पेचात पडले. 'बरं' म्हणाले, गाठोडे घेऊन बाजाराला गेले. '**अन्न उदक सोडीले। ध्यान देवाचे लागले**' मग धंद्याची शुद्ध कुठली ? अंधार पडला भानावर आले. जवळच गणोबा (गणेशमूर्ती) होते. त्यांच्या हवाली गाठोडे केले. तुम्हीच घ्या म्हणाले. शेजारच्या धोंडोबाला (दगडाला) म्हणाले, 'तूं याला जामीन बरं का ?' आणि थेट देवापुढे ठाकले. '**केशवासी नामा सांगतसे भावे। व्यवसाय स्वभावे केला तैसा।**' देव हसले. नामदेव घरी आले. राजाई आनंदली. सारा माल खपला. दामाशेटी आले. त्यांनीही विचारले. नामदेव म्हणाले, गणोबांना कापड विकले, आठवड्याची बोली आहे. धोंडोबा जामीन आहे. त्यांनी कपाळाला हात लावला. '**उदीम सारा बुडविला। गमाविले भांडवल।**' 'उधारी आण' म्हणून लकडा लावला. नामदेव गेले, पण गणोबा, धोंडोबा दोन्ही दगडच. नामदेव म्हणाले, 'धोंडोबा, तुम्ही जामीन आहात. चला.' ढकलत ढकलत घरी आणले. कुलूप लावले. देवळात गेले. देवाला आपला प्रताप सांगितला. घरी

आले. राजाईने दामाशेटींना सांगितलेच होते. ते कडाडले, **'नाम्या, काय केले। धोंड्या कशाला कोंडिले।।'** डोके फोडून काय होणार ? धोंडा बाहेर ढकलला. अचाट धक्का बसला. धोंडा निखळ सोन्याचा होता. गरीबाचे घरी खूट झाले, तरी गावांत कूट होते. बातमी फुटली. धोंड्याचा मालक तावातावात आला. मालाचे पैसे दिले. अन् धोंडा घेऊन गेला. देव नामदेवाचा पाठिराखा आहे. डंका झाला.

नामदेवांचे मेहुणे आले. आणखी एक चमत्कार झाला. तिथी दशमी होती. **नामा म्हणे कांते दशमी एक भुक्ति। भोजन निश्चिती करुं नये।।** उद्या एकादशी. परवा द्वादशीला पारण्याचे भोजन. राजाईचा जळफळाट झाला. आताही देव धावले. वाणी झाले. वराईची गोणी आणली. लागेल तेवढे वेचा म्हणाले, पण नामदेवांना रुचले नाही. त्यांनी ब्रह्मवृंदांना साऱ्या मोहरा दान केल्या. राजाईने आग पाखडली. परिसा भागवंतांच्या मंडळींची व तिची चंद्रभागेतीरी भेट झाली. काकुळतीने त्यांचा परीस आणला. लोखंडाचे सोने केले. घरी थाट झाला. नामदेवांनी आग्रहाने परीस घेतला आणि बिनदिक्कत चंद्रभागेत भिरकावला. परिसा भागवत भडकले. नामदेव म्हणाले, 'चला देतो.' चंद्रभागेत आले. ओंजळभर वाळू घेतली. हताश परिसा भागवतांनी हिय्या करून खड्याला लोखंडी किल्ली लावली. सोने झाले. प्रत्येक खडा पारखला. थक्क झाले. आरती गायिली, **'प्रत्यक्ष प्रचीत हे वाळवंट परीस केले.'** राजाईला उपरती झाली. म्हणाल्या, **'आता हे संसारीं मीच धन्य जगी। जे तुम्हां अर्धांगी विनटले'** सारी पंढरी दुमदुमली. नकळत नामदेवांना अभिमान झाला. ते पुण्यक्षेत्र आळंदीत आले. ज्ञानदेवादिकांचे भेटीस गेले. सर्वांनी नामदेवांचे दर्शन घेतले. नामदेवांनी प्रतिदर्शन घेतले नाही. माउलींनी हे हेरले. त्यांचा अभिमान जावा म्हणून योजना केली. पण नामदेव दुखवले. ते पंढरीत देवापुढे उभे ठाकले. देवांनी समजावले. औंढ्या नागनाथ येथील विसोबा खेचरांना गुरू करण्यास सांगितले. विसोबांनी अंतर्ज्ञानाने ते जाणले. नामदेव आले. तर **'खेचरे केली माव। पिंडीवरी ठेविला पाव'** नामदेव भांबावले, पाय काढा म्हणाले. विसोबा म्हणाले, **'जेथे नाही देव तेथे ठेवी पाव'** नामदेवांनी जिथे जिथे त्यांचे पाय ठेवले, तिथे तिथे

पिंड प्रगटली. त्यांचा अहंकार गळाला. ते विसोबांना शरण गेले. विसोबा त्यांचे गुरू झाले. नामदेव पंढरीत परतले. **'नामदेवा भेटी ज्ञानदेव आले। लोटांगण घातले नामदेवे।'** असा नामदेवात पालट झाला. ज्ञानदेव-नामदेव मिलन झाले. देवाच्या अनुज्ञेने तीर्थयात्रेला गेले. मार्गात दोघांचा अपार सुखसंवाद झाला. नामवेद जन्मला. माउली म्हणाले, **'तो हा राजमार्ग सर्वांहुनी चांग। सदा संत संग वाचे नाम॥'** **'रामकृष्णहरी। देहु आळंदी पंढरी। गाथा भागवत ज्ञानेश्वरी। बाळक्रीडा तीर्थावळी॥'** संतपंचसूत्री झाली. ज्ञानदेव म्हणे, **'तूं भक्त शिरोमणी'** **'नामा म्हणे माझा ज्ञानराज प्राण'** असे एक हृदय झाले आणि पंढरीत परतले.

देवांनी उभयतांना गहिवरून आलिंगन दिले. देवांनी पुढाकार घेतला. तीर्थयात्रेचे ब्रह्मवृंदांना प्रथम मावंदे घातले. नंतर अठरा पगड जातीच्या संत मांदियाळीला, नामदेव परिवारासह मावंदे घातले. **'आनंदें कवळ देती एका मुखीं एक'** असा अभेद पंक्तिसोहळा झाला. ब्रह्मवृंदांनी नामदेवांच्या मस्तकी मंत्राक्षता टाकल्या.

वाळवंटात कीर्तनसोहळ्याला महापूर लोटला. **'संत भार पंढरीत, कीर्तनाचा गजर होत। तेथे असे देव उभा'** भक्तांचे डोळे तृप्त झाले. नामदेवांनी **'आम्हां सांपडले वर्म। करूं भागवतधर्म।'** अशी हाक दिली. ती महाराष्ट्राच्या कानाकोपऱ्यात, दऱ्याखोऱ्यांत पोचली. गावोगावी भजन - कीर्तनाचे थवे लोटले. रामजन्म, हनुमान जन्म, नृसिंह जन्म, कृष्ण जन्माचे सप्ताह ठाकले. संस्कृती दृढमूल झाली. शिवरात्रीला शिवरात्र कथा व हर हर महादेव गजर झाला. शिवविष्णू द्वैताचे, द्वेषाचे मूळ नष्ट झाले. औंढ्या नागनाथ येथे महाशिवरात्रीला नामदेवांनी कीर्तन मांडले. साक्षात शंभू महादेव गाभारा फिरवून **'फिरविले देऊळ जगामाजी ख्याति'** सामोरे झाले. शिव-विष्णु ऐक्याचा ध्वज उभारला. पंढरी सांस्कृतिक, आध्यात्मिक राजधानी झाली. काकडा भजनाने प्रारंभ होई आणि गोपाळ काल्याने वारीची व सप्ताहाची सांगता होई. **'कालया कौशल्य नामदेव जाणे'** निवृत्तिनाथांनी गौरव केला.

एका कार्तिकी एकादशीला **'ज्ञानदेव म्हणे विठ्ठलासी। समाधान तूंचि होसी। परी समाधि हे तुजपाशी। घेईन देवा॥'** **'शांति क्षमा दया ऋद्धि। हे ही**

**पाहतां मज उपाधी। तुझिया नामाची समाधी। कृपानिधि मज द्यावी। बाबा बाळछंदो॥'** सारे सारे व्याकूळ झाले. अश्रुगंगेचे पाट वाहिले. शके १२१८ च्या कार्तिक वद्यात श्री क्षेत्र आळंदीत नामदेव, त्यांची मुले, संत मांदियाळीचा पूर लोटला. मुंगीलाही मार्ग नव्हता. साऱ्यासाऱ्यांना संत नामदेवांनी आदी ते समाधीपर्यंतचा अभंगबद्ध जीवनपट कथन केला. त्यांनी व देवांनी आळंदीचे श्रेष्ठत्व प्रतिपादिले. देवांनी ज्ञानदेवांचा अपार महिमा गायिला. अष्टमीपासून उत्सव मांडला. त्रयोदशीची सकाळ उजाडली. नामदेव पुत्र नारा, विठा, महादा, गोंदा यांनी समाधि परिसर सुशोभित केला. **'देव, निवृत्ति यांनी धरिले दोन्ही कर। जातो ज्ञानेश्वर बैसावया॥ जावोनी ज्ञानेश्वर बैसले आसनांवरी। पुढे ज्ञानेश्वरी ठेवियली॥ तीन वेळा देवा जोडिले करकमळ। झाकियेले डोळे ज्ञानदेवें॥'** साधकांचा मायबाप समाधिस्थ झाला. 'माउली, माउली, माउली ज्ञानोब्रा माउली' हलकल्लोळ झाला. नामदेवांनी ज्ञानदेवांची 'इंद्रायणीचे तटी' आरती केली.

देववचनानुसार श्री क्षेत्र सासवड येथे मार्गशीर्ष वद्य १३ ला संत सोपानदेव संत मांदियाळीच्या साक्षीने समाधिस्थ झाले. संत चांगदेव श्री क्षेत्र पुणतांबे जि. जळगांव येथे माघ वद्य १३ ला समाधिस्थ झाले. शके १२१९ वैशाख वद्य दशमीला संत मुक्ताई मुक्ताईनगर जि. जळगांव येथे गुप्त झाल्या. ज्येष्ठ वद्य १२ शके १२१९ ला संत निवृत्तिनाथ श्रीक्षेत्र त्र्यंबकेश्वर, जि. नाशिक येथे समाधिस्थ झाले. नामदेवांच्या मुलांनी सर्व समाधिस्थानी अपार सेवा केली. हे सर्व समाधिसोहळे नामदेवांनी अपार श्रद्धेने शब्दबद्ध केले. ही सर्व क्षेत्रे अजरामर पुण्यभूमी झाली.

शके १२०७ मध्ये माघ व ३ ला संत नरहरी महाद्वारात गुप्त झाले. संत जगमित्र नागा श्रीक्षेत्र परळी जि. बीड येथे कार्तिक शुद्ध ११ ला समाधिस्थ झाले. आषाढ वद्य १४ ला संत सावता माळी श्री क्षेत्र अरण जि. सोलापूर येथे समाधिस्थ झाले. संत गोरोबा श्री क्षेत्र तेर जि. उस्मानाबाद येथे चैत्र वद्य १३ ला समाधिस्थ झाले. या सर्व सख्यांच्या वियोगाने नामदेव विकळ व एकाकी झाले. त्यांनी दक्षिण भारत यात्रा केली. पण उत्तर भारत त्यांच्या ध्यानी, मनी, स्वप्नी बसला होता. राजस्थानात

बिकानेरजवळ कोलादजीला देवाने त्यांच्या हाकेला साद दिली आणि निर्जळ कूप (विहीर) पाण्याने तुडुंब भरला. भोपाळला कमलाकर व सुमती ब्राह्मण दांपत्याच्या घरी संत मांदियाळी आली. सुमतीने मुलगा पद्माकर याला स्वयंपाकासाठी गोवऱ्या आणण्यास सांगितले. दुर्दैवाने तिथे पद्माकर सर्पदंशाने मृत झाला. भाविक दांपत्याने मनावर दगड ठेवला. संतांची पंगत वाढली. पण नामदेवांना अशुभ जाणवले. त्यांनी नामाचा टाहो फोडला. पद्माकर जिवंत झाले, आदी घटना सतत आठवत होत्या. उत्तर भारतीयांच्या मनामनांत नामदेव ठसले, बसले होते. ते सारे जणू त्यांना खुणावत होते.

उत्तर भारतात भट्टीवालचा जाल्लो उर्फ जाल्हन, मथुरेचे विष्णु स्वामी, घुमानचे फिरणा शहीद व बहोरदास, तारागांवचे केशो-कलंदर, धारीवालचे लध्धाखत्री, हरिद्वाराचे त्रिलोचन अशी निष्ठावंत भक्त मांदियाळी नामदेवाभोवती गोळा झाली. नामदेव त्यांच्या त्यांच्या बोलीभाषेत समरस झाले. त्या भाषेत अभंगरचना केली. विषय मांडले. या सर्व शिष्यांनी नामदेवपीठे स्थापली. त्यांच्या कार्याचा ठसा व वसा उचलला. ही गेली सातशे वर्षे अखंड कार्यरत आहेत. आम जनतेने नामदेवांना डोक्यावर घेतले.

नामदेवांचा हा प्रभाव दिल्लीचा सुलतान महंमद तुघलक याला इस्लामला घातक वाटला. त्याने नामदेवांना पकडून आणले. त्यांना 'तू मुसलमान हो' म्हणून जबरदस्ती केली. नामदेव म्हणाले, माझा प्रभू समर्थ आहे. **'जे जे घडेल ते ते घडो। देह राहो अथवा पडो।। देह जावो हेचि घडी। पाय हरीचे न सोडी।।'** सुलतान चिडला. नामदेवांनी त्याला सलामसुद्धा केला नव्हता. तो भडकला. नामदेवांना चिरडण्यासाठी त्यांच्या अंगावर हत्ती सोडला. पण चमत्कार झाला. हत्तीने नामदेवांनाच सलाम केला. सुलतान इरेला पेटला. त्याने दरबारात गाय आणली व मारली. 'ती जिवंत कर, नाहीतर तुझे मुंडके उडवतो' म्हणाला. नामदेवांनी नामाचा टाहो फोडला. अजब घडले. गाय जिवंत झाली. तिला वासरू पिऊं लागले. नामदेवांनी दुधाने कटोरा भरला. सुलतानापुढे धरला. सुलतान वरमला. त्याने नामदेवांना सोडले. भर

दरबारातील या घटनेने नामदेवांची दिगंत कीर्ती झाली.

गुरु ग्रंथसाहेबमध्ये नामदेवांची ६१ पदे आहेत. त्यात 'सुल्तान पुछूँ बै नामा' यात ही कथा सविस्तर आहे. महिकावतीच्या बखरीतही हा चमत्कार नोंद आहे. उत्तरेतील सर्व संतांनीही हा चमत्कार नोंदला आहे. उत्तरेत सर्वत्र शेकडो नामदेव मंदिरे आहेत. पंजाब, मध्यप्रदेशात नामदेव जयंतीची सुट्टी आहे. सर्वत्र संत नामदेव कथा व गौरव गायिला जातो. घुमान जि. गुरुदासपूर (पंजाब) येथे नामदेवांचे दीर्घकाळ वास्तव्य होते. तेथे नामदेव दरबार, नामदेव चरणकमल व नामदेव तपियाना अशी प्रचंड मंदिरे आहेत. घुमानमध्ये नामदेवजयंतीदिनी कित्येक लाखांची यात्रा भरते. घुमानचे पीठ बहोरदासांचे घराणे चालवते. संत नामदेवांमुळे उत्तरेत भारतीय संस्कृतीचे फार मोठे रक्षण झाले, हे इतिहासमान्य आहे.

नामदेव महाराष्ट्रात येत-जात. त्यांचे पट्टशिष्य संत चोखोबांनी वैशाख वद्य पंचमीला गुरुवारी मंगळवेढा येथे गावकुसाचे बांधकाम करताना देह ठेवला. त्यांच्या अस्थी 'विठ्ठल विठ्ठल' म्हणतात, ही देवांनी खूण सांगितली. त्या नामदेवांनी संकलित केल्या. पीतांबरात घेतल्या. **'देवाचे अंचळी उठिला गजर। चोखा माझा जीव चोखा माझा भाव। कुळदेव धर्म चोखा माझा।।'** असे देवांनी धन्योद्गार काढले. नामदेवांनी नामाच्या गजरात त्यांना महाद्वारात समाधी दिली. सातशे वर्षापूर्वीच्या नामदेवांच्या या कार्याला आजही जोड नाही, तोड नाही. गुरूने शिष्याची बांधलेली समाधी हे दर्शनही दुर्लभ आहे.

नामदेव पुन्हा पंजाबात गेले. काही वर्षे राहिले. उत्तरेतील शिष्यांचे जीवनात व अन्यत्र त्यांच्या अपार कृपेचे दर्शन आजही वास्तवात आहे. जनमसाखी व जीवन झलकियाँ या हिंदी चरित्रात त्या ग्रथित आहेत. नामदेवात आणि देवात भेद नाही. 'नामे नारायण नहीं भेद' हा नारा उत्तर भारतात अखंड दुमदुमत आहे.

नामदेवांना पंढरीची ओढ लागली. पण उत्तरेतील सख्यांना व भक्तांना दुखवणे त्यांच्या जिवावर आले. कुणाच्या ध्यानी, मनी न येता माघ शुद्ध द्वितीयेला त्यांनी पंजाब सोडले. त्या भूमीला अखेरचा साष्टांग दंडवत घातला व निरोप घेतला. माघ

शुद्ध २ लाही तिथे प्रचंड उत्सव होतो. नामदेव पंढरीत आले. कार्तिक शुद्ध एकादशीला त्यांना ज्ञानदेवांनी देवाला केलेली समाधीची विनवणी आठविली. आपणही तोच धडा गिरवण्याचा त्यांनी निश्चय केला. शके १२७२ च्या आषाढी एकादशीचा दिवस होता. नामदेवांनी देवाला आपणांस समाधी देण्याची आर्त प्रार्थना केली. '**आषाढ शुद्ध एकादशी। नामा विनवी विठ्ठलासी। आज्ञा द्यावी वो मजसी। समाधी विश्रांतिलागी॥**' भर वारीत सर्वांना चटका लावणारा प्रसंग नको म्हणून '**देव म्हणे नाम्या राहे पक्षभरी। पुरतील अंतरी कोड तुझे ॥**' नामदेवांनी ते मान्य केले. '**महाद्वारी सुख असे या सुखाचे। लागती संतांचे चरणरज**' व '**नामा म्हणे आम्ही पायरीचे चिरे**' असे आपले समाधिस्थान सांगितले. वारीत ही वार्ता कानोपकानी झाली. ज्ञानदेवांची वद्य १३ ची तिथीच देवांनी नामदेवांसाठी धरली. जनाईसह सर्व नामदेव परिवारानेही समाधीत सहभागी होण्याचा निश्चय केला. देवाला नकार देणे अशक्यच होते. मोठी सून लाडाई प्रसूतीसाठी माहेरी होती. (तिचा मुलगा मुकुंद याचाच आज वंश आहे.) वैष्णव पताकांचे भार घेऊन नामाच्या जयघोषात पंढरीत येत होते. नामदेवांनी सख्या-सोबत्यांना वस्तुपाठ दिलेचे कथन केले. साऱ्या हरिदासांना व हरिभक्तीला देवाकडे आकल्प आयुष्याचा उदंड आशीर्वाद मागितला. राही, रखुमाई, सत्यभामा आदींनी नामदेवांना कडकडून आलिंगन दिले. देवांनी तर नामदेवांना आपल्या पोटाशी धरून प्रेमाश्रूंचा अभिषेक घातला. नामदेव भिजून चिंब झाले. त्यांना धन्य धन्य वाटले. देवाने त्या १४ जणांचे परिवारास नामाच्या प्रचंड जयघोषात महाद्वारी समाधी दिली. त्यावेळी नामदेव जनाबाई, नामदेव जनाबाई हा महान गजर दुमदुमत होता. शेवटी संत परिसा भागवतांनी आरती ओवाळली.

अशा संत शिरोमणी नामदेवांच्या अभंगगाथेची मांडणी संत परंपरेची धारणा प्रमाण मानून केली आहे. जन्म नोंदीतील 'शतकोटी अभंग करील प्रतिज्ञा' व आरतीतील 'शतकोटी अभंग रचले' ही वचने उपलब्ध गाथा अत्यल्प अभंग असल्याचे सूचित करतात. दुबार अभंग वगळले आहेत. सुसंगत विषयासाठी थोडे

अभंग दुबार घातले आहेत. वाचकांनी व भक्तमंडळींनी हे ध्यानी घ्यावे ही नम्र विनंती. गाथेत जे उत्कट व भव्य दर्शन आहे, ते संत नामदेवांचे आहे. जे अप्रस्तुत व उणीवेचे आहे, ते आमचे आहे. गाथा मांडणीत '**नाचूं कीर्तनाचे रंगी। ज्ञानदीप लावूं जगी।।**' '**आम्हां सापडले वर्म। करूं भागवत धर्म।।**' व '**आम्हां कीर्तन कुळवाडी । आणिक नाहीं उदीम जोडी।।**' ही संत नामदेवधारणाच आम्ही हृदयात बाळगली आहे. संत नामदेव हे देवाचे प्रेम-भांडारी आहेत. '**सिंधूहूनी सखोल। सुरस तुझे बोल।**' असा माउलींचा निर्देश आहे. स्वाभाविकच त्या प्रेम-भांडारात नामप्रेम, देवप्रेम, भक्तप्रेम, देवचरित्रप्रेम, संतप्रेम, संतांचे देवप्रेम, देवांचे संतप्रेम व नामदेवप्रेम आहे, ते न्याहाळावे अनुभवावे व त्या प्रेमरसात न्हाऊन निघावे, ही सर्वांच्या चरणी विनम्र प्रार्थना.

गीता प्रेस, गोरखपुरने श्री. भिकाजी सदाशिव गणबावले, सरवडे यांच्या सांगण्यावरून ही गाथा प्रकाशित करण्याचे ठरवले. त्यामुळे या आवृत्तीची संपादन सेवा माझ्या पदरी पडली. मी धन्य झालो. मी गीताप्रेसचा ऋणी आहे.

संपादक,

**ह.भ.प. धों. ए. तथा दादा गोंदकर**

॥ श्री रुक्मिणी पांडुरंग प्रसन्न॥

॥ श्री संत नामदेवाय नमः॥

# संत नामदेवांची अभंगगाथा

## मंगलाचरण

१. प्रथम नमन करूं गणनाथा। उमाशंकराचिया सुता ।
चरणावरी ठेवूनि माथा। साष्टांगीं आतां दंडवत । १ ।
दुसरी वंदूं सारजा। जे चतुराननाची आत्मजा।
वाक्सिद्धि पाविजे सहजा। तिच्या चरणवोजा दंडवत । २ ।
आतां वंदूं देव ब्राह्मण। ज्यांचेनि पुण्यपावन ।
प्रसन्न होऊनी श्रोतेजन । त्यां माझें नमन दंडवत । ३ ।
आतां वंदूं साधु सज्जन। रात्रंदिवस हरीचें ध्यान ।
विठ्ठल नाम उच्चारिती जन । त्यां माझें नमन दंडवत । ४ ।
आतां नमूं रंगभूमिका। कीर्तनीं उभे होती लोकां।
टाळ मृदंग श्रोते देखा । त्यां माझें दंडवत । ५ ।
ऐसें नमन करोनि सकळां। हरीकथा बोले बोबड्या बोला ।
अज्ञान म्हणोनि आपल्या बाळा । चालवी सकळां नामा म्हणे। ६ ।

२. प्रथम नमूं गजवदनु। गौरीहराचा नंदनु ।
सकळ सुरवरांचा वंदनु। मूषकवाहनू नमियेला । १ ।
त्रिपुरावधीं गणाधिपति। हरें पूजिला भावें भक्ती ।
एके बाणें त्रिपुर पाडिला क्षितीं । तै पशुपति संतोषला । २ ।
इंद्रादिकीं अष्टलोकपाळीं । लंबोदरू पूजिला कनककमळीं ।
त्यासी प्रसन्न झाला तयेवेळीं । ह्मणवूनी सकळीं पूजियेला । ३ ।
सटवें रात्रीं मदनु शंभरें नेला । प्रद्युम्न समुद्रामाजी टाकिला ।
तैं कृष्णें विघ्नहरु पूजिला । प्रद्युम्न आला रतीसहित। ४ ।
पुजिला साही चक्रवर्ती । त्यांचिया पुरती आर्ती ।
युधिष्ठिरें पूजिला चतुर्थी। राज्य प्राप्ति झाली तया । ५ ।

ह्मणवूनि सुरवरीं केली पूजा। त्रिभुवनीं आणिक नाहीं दुजा।
विष्णुदास नामा म्हणे स्वामी माझा। भावें भजा एकदंता। ६ ।

३. गणेश नमूं तरी तुमचा नाचणा। म्हणोनि नारायणा नमन माझें। १ ।
सारजा नमूं तरी तुमची गायणी। म्हणोनि चक्रपाणि नमन माझें। २ ।
इंद्र नमूं तरी तुमचिया भुजा। म्हणोनि गरुडध्वजा नमन माझें। ३ ।
ब्रह्मा नमूं तरी तुमचिये कुसी। म्हणोनि हृषिकेशी नमन माझें। ४ ।
शंकर नमूं तरी तुमची विभूती। म्हणोनि कमळापति नमन माझें। ५ ।
वेद नमूं तरी तुझाचि स्थापिता। म्हणोनि लक्ष्मीकांता नमन माझें। ६ ।
गंगा नमूं तरी तुमच्या अंगुष्ठीं। म्हणोनि जगजेठी नमन माझें। ७ ।
लक्ष्मी नमूं तरी तुमच्या पायांतळी। म्हणोनि वनमाळी नमन माझें। ८ ।
ऐसें नमन माझें सकळिकां देवां। नामा म्हणे केशवा नमन माझें। ९ ।

४. गाण जरी म्हणों तरी गणेश सारजा। आणीक नाहीं दुजा तया वांचूनी। १ ।
नाचणू म्हणों तरी तांडववनीं महेश्वरू। तो एक नृत्यकारु करूं जाणे। २ ।
बोलका म्हणों तरी बोलके वेद चारी। त्याने काय उरी जें मी बोलों। ३ ।
जाणु म्हणों तरी अठराही जाणें। त्यापें काय उणें जें मी जाणों। ४ ।
कळावंत म्हणों तरी चंद्र सूर्य दोन्ही। बारा सोळा गगनीं दावितातीं। ५ ।
नामा म्हणे सर्व अवघे वंचले। केशवें आपुलें म्हणावें मातें। ६ ।

५. देवा आदिदेवा सर्वत्रांच्या जीवा। ऐकें वासुदेवा दयानिधी। १ ।
ब्रह्मा आणि इंद्रा वंद्य सदाशीवा। ऐकें वासुदेवा दीनबंधु। २ ।
चौदा लोकपाळ करिती तुझी सेवा। ऐकें वासुदेवा कृपासिंधु। ३ ।
योगियांचे ध्यानीं नातुडसी देवा। ऐकें वासुदेवा जगद्गुरु। ४ ।
निर्गुण निर्विकार नाहीं तुज माया। ऐकें कृष्णराया कानडिया। ५ ।
करुणेचा पर्जन्य शिंपी मज तोया। ऐकें कृष्णराया गोजरीया। ६ ।
नामा म्हणे जरी दाविशील पाया। तरी वदावया स्फूर्ति चाले। ७ ।

## चरणवंदन

६. दीनाची माऊली। आजि म्यां देखियेली। १ ।
कटी ठेउनियां कर। उभी राहे विटेवर। २ ।
मुगुट रत्नांचा साजिरा। वरी मोतियांचा तुरा । ३ ।
रुप लावण्य गोजिरें। हृदयी पदक साजिरें। ४ ।
कासे पिवळा पीतांबर। चरणी ब्रिदाचा तोडर। ५ ।
भक्ता कृपेची साउली। नामा वंदी पायधुळी। ६ ।

७. विटेवरी समचरण सुंदर। बाळ सुकुमार यशोदेचें। १ ।
वाळें वांकी गर्जे तोडर चरणी । नाद झणझणी वाजताती। २ ।
कांसे कसियेला पीत पीतांबर । लोपे दिनकर तेणें प्रभा। ३ ।
नामा म्हणे नाही तुझ्या रूपा पार। तेथें मी किंकर काय वानूं। ४ ।

८. समचरणी उभा कैवल्याचा गाभा। देत असे शोभा पीतांबर। १ ।
चरणीचा तोडर गर्जे दैत्यावरी । मोरपीसा शिरी खोविली असे। २ ।
कंठी कौस्तुभमाळ कुंडले शोभती । मावळलीही ती रविशशी। ३ ।
कस्तुरीचा टीळा व्यंकटी भृकटी। कंदर्पाच्या कोटी न तुळसी । ४ ।
नामा म्हणे याच्या प्रकाशाच्या तेजे। उरले नाही दूजे कोण ठाई। ५ ।

९. श्रीमुख साजिरें कुंडलें गोमटीं। तेथें माझी दृष्टी बैसलीसे। १ ।
कटावरी कर समचरण साजिरे। देखावया झुरे माझें मन। २ ।
माहेरीची आस दसरा दिवाळी। बाहे ठेवी निढळी वाट पाहे। ३ ।
बंदिजन नामा उभा महाद्वारीं। कीर्ति चराचरीं वर्णितसे। ४ ।

१०. सुखाचें हें सुख श्रीहरि मुख। पाहतांही भूक ताहान गेली । १ ।
भेटली भेटली विठाई माउली। वासना निवाली जिवांतील । २ ।
चंद्रासी चकोर मेघासी मयूर। वाटे तैसा भर आनंदाचा । ३ ।
नामा म्हणे पाप आणि ताप दुःख। गेलें झालें सुख बोलवेना। ४ ।

११. आवडे जें जीवा तें पंढरिये उभें। पुंडलिकें लोभें राहविलें। १।
जोडुनि पाऊलें ठेवियलीं विटे। करद्वय गोमटें कटावरी। २।
कान मुख डोळे न म्हणती पुरे। सेवितां न पुरे धणी मना। ३।
गोड लागे पोट न भरे न धाय। भुकेलीच राहे भूक सदा। ४।
नामा म्हणे संतसंगती विश्वास। घेऊं अनुभवास फार फार। ५।

१२. कस्तुरीचा टिळा रेखिला कपाळी। तेणें ते शोभली मूर्ति बरी। १।
बरवा बरवा विठ्ठल गे बाई। वर्णावया साही शिणताती। २।
श्रीवत्सलांछन वैजंयती गळां। नेसला पाटोळा तेज:पुंज। ३।
पाउलें समान विटेवरी नीट। नामा म्हणे भेट घ्यावी त्याची। ४।

१३. ब्रह्म अविनाश आनंदघन। याहुनि चरण गोड तुझे। १।
ते जीवें न सोडीं अगा पंढरीनाथा। जाणसीं तत्वतां हृदय माझें। २।
परात्पर वस्तु जे कां अपरंपार। तियेचा साक्षात्कार पाय तुझे। ३।
सच्चिदानंदघन जेथें हरपलें मन। त्याहुनि चरण गोड तुझे। ४।
नामा म्हणे तुझीं पाउलें सुकुमार। तें माझें माहेर विटेवरी। ५।

१४. झणी दृष्टी लागे तुझ्या सगुणपणा। जेणें माझ्या मना बोध केला। १।
अनंता जन्मींचे विसरलों दु:ख। पाहतां तुझे मुख पांडुरंगा। २।
योगियांच्या ध्यानी ध्यातां नातुडसी। तो तूं आह्मांपाशीं मागें पुढें। ३।
नामा म्हणें जीवें करीन निंबलोण। विटेसहित चरण वोंवाळीन। ४।

१५. आनंद अद्वय नित्य निरामय। जे का निज ध्येय योगियांचे। १।
ते समचरण साजिरे ठेवुनि विटेवरी। उभे भीमा तीरी पंढरीये। २।
जे पुराणांसी वाड श्रुती नेणती पार। ते झाले साकार पुंडलिका। ३।
नामा म्हणे ज्याचे सनकादिकां ध्यान। ते माझे कुळदैवत पंढरीराव। ४।

१६. जे ज्ञानियांचे ज्ञेय ध्यानियांचे ध्येय। पुंडलिकांचे प्रिय सुख वस्तु। १ ।
ते हे समचरण उभें विटेवरी। पहा भीमातीरीं विठ्ठल रूप। २ ।
जें तपस्वियांचे तप जें जपकांचे जाप्य। योगियांचे गौप्य परम धाम। ३ ।
जें तेजकांचें तेज जें गुरु मंत्राचे गुज। जें पूजकांचे पूज्य कुळदैवत। ४ ।
जें जीवनातें जीवविते पावकातें निववीतें। जें भक्तांचे उगवितें मायाजाळ। ५ ।
नामा म्हणे तें सुखचि आयतें। जोडलें पुंडलिकातें भाग्य योगें। ६ ।

## श्री विठ्ठलदर्शन

१७. निर्गुणींचे वैभव आलें भक्तिमिषें। तें हें विठ्ठलवेषें ठसावलें। १ ।
बरविया बरवें पाहता नित्य नवें। हृदयी ध्यातां निवे त्रिविधताप। २ ।
चोविसांवेगळे सहस्रां आगळे। निर्गुणा निराळें शुद्धबुद्ध। ३ ।
वेदां मौन पडे श्रुतींसी कानडे। वर्णितां कुवाडें पुराणांसी। ४ ।
भावाचें आळुके भुललें भक्तिसुखें। दिधले पुंडलीकें सांधूनियां। ५ ।
नामा म्हणे आम्हां अनाथा लागुनी। निडारले नयनी वाट पाहें। ६ ।

१८. ज्ञान सत्य मुक्त शुद्ध बुद्ध युक्त। कारण रहित निरंजन। १ ।
तें आम्ही देखिलें चर्मचक्षु दृष्टीं। उभा वाळवंटी पंढरीये। २ ।
वेदां अगोचर तयां सहस्रमुखा। तें झालें पुंडलिका लोभापर। ३ ।
परतल्या श्रुती म्हणती नेती नेती। आम्हां गातां गीतीं सापडलें। ४ ।
स्वरुपाचा निर्धार बोलती पुराणें। शिणली दरुशनें वेवादतीं। ५ ।
नामा म्हणे यांसी भावची कारण। पावावया चरण केशवाचे। ६ ।

१९. विटेवरी उभा दीनांचा कैवारी। भेटाया उभारी दोन्ही बाह्या। १ ।
गुण दोष त्यांचे न पाहेचि डोळां। भेटे वेळोवेळां केशिराज। २ ।
ऐसा दयावंत घेत समाचार। लहान आणि थोर सांभाळितो। ३ ।
सर्वांलागीं देतो समान दरुशन। उभा तो आपण सम पायी। ४ ।
नामा म्हणे तया भक्तांची आवडी। भेटावया कडाडी उभाची असे। ५ ।

२०. योगीयांचे ब्रह्म शून्य व्योमाकार। आमुचें साकार विटेवरी। १ ।
दाटुगे नागर कटी ठेऊनि कर। सर्वस्वे उदार भक्तालागी। २ ।
ज्ञानिया सिद्धांती लक्षापरी नये। आमुची वाट पाहे अनाथाची। ३ ।
पुंडलिका भावा वोळले वोरसें। नेणों काय कैसें प्रेम त्याचे। ४ ।
जाप्यकाचें जाप्य नाम मंत्रमय। आमुचें भक्तिप्रिय संसारीका। ५ ।
नामा म्हणे जीवें करीन ओंवाळणी। झणी चक्रपाणि दिठावसी। ६ ।

२१. माझा भाव तुझे चरणी। तुझें रुप माझे मनीं। १ ।
सांपडलों एकमेका। जन्मोजन्मी नोहे सुटिका। २ ।
त्वां मज केलें रे विदेही। म्यां तुज धरिले हृदयी। ३ ।
त्वां तोडिली माझी माया। मी जडलो तुझ्या पाया। ४ ।
नामा म्हणे गा सुजाणा। सांग ठकिलें कोणेकोणा। ५ ।

२२. जीव विठ्ठल शिव विठ्ठल। आत्मा विठ्ठल अखंडीत। १ ।
जनक विठ्ठल जननी विठ्ठल। सोयरा विठ्ठल सांगाती। २ ।
अहिक्य विठ्ठल परत्र विठ्ठल। निरंतर विठ्ठल तारिता। ३ ।
नाम विठ्ठल रुप विठ्ठल। पतित पावन विठ्ठल विठ्ठल नामा। ४ ।

२३. विठ्ठल आवडी प्रेमभावो। विठ्ठल नामाचा रे टाहो।
तुटला हा संदेहो। भवमूळव्याधीचा । १ ।
म्हणा नरहरि उच्चार। कृष्ण हरि श्रीधर।
हेंचि नाम आम्हां सार। संसार तरावया। २ ।
एकतत्त्व त्रिभुवनीं। हेंचि आम्हा हरिपर्वणी।
जें गाइजे पुराणीं। वेदशास्त्रांसहित । ३ ।
नेघों नामाविण कांहीं। विठ्ठल कृष्ण लवलाही।
नामा म्हणे तरलों पाहीं। विठ्ठल विठ्ठल म्हणताचि। ४ ।

२४. विसांवा विठ्ठल सुखाची साउली। प्रेमपान्हा घालीं भक्तांवरी। १ ।
दाखवी चरण दाखवीं चरण। दाखवीं चरण नारायणा। २ ।
विठ्ठल आचार विठ्ठल विचार। दावीं निरंतर पाय आतां। ३ ।
नामा म्हणे नित्य बुडालों संसारीं। धांवोनियां धरीं हातीं मज। ४ ।

२५. तीर्थ विठ्ठल क्षेत्र विठ्ठल। देव विठ्ठल देवपूजा विठ्ठल। १ ।
माता विठ्ठल पिता विठ्ठल। बंधु विठ्ठल गोत्र विठ्ठल। २ ।
गुरु विठ्ठल गुरुदेवता विठ्ठल। निधान विठ्ठल निरंतर विठ्ठल। ३ ।
नामा म्हणे मज विठ्ठल सापडला। म्हणोनि कळिकाळां पाड नाहीं। ४ ।

२६. जय विठ्ठल श्री विठ्ठल। जय जय विठ्ठल विठ्ठल। १ ।
परब्रह्म विठ्ठल मूर्ति विठ्ठल। निरंजन विठ्ठल विठ्ठल विठ्ठल। २ ।
जोचि नाम तोचि देवो। ऐसें म्हणों तरी नाहीं संदेहो। ३ ।
म्हणे विष्णुदास नामा। तो नेईल परमधामा। ४ ।

## ❀ भूपाळी व काकड आरतीचे अभंग ❀

२७. उठाउठा प्रभात जाहली। चिंता श्रीविठ्ठल माऊली।
दीन जनांची साउली। येई धाउनि स्मरतांचि। १ ।
पंढरपुरीं जे भिमातटीं। सुंदर मनोहर गोमटी।
दोन्ही कर ठेवोनियां कटी। भेटीसाठीं तिष्ठतसे। २ ।
किरीट कुंडले मंडित। श्रीमुख अति सुंदर शोभत।
गळां वैजयंती डुलत। हार मिरवत तुळसीचा। ३ ।
सुरेख मूर्ति सगुण सांवळी। कंठी कौस्तुभ एकावळी।
केशर उटी परिमळ आगळी। बुका भाळीं विलसतसे। ४ ।
पीत पीतांबर कसला कटी। अक्षयी वीट चरण तळवटी।
सकळ सौंदर्य सुखाची पेटी। हृदय संपुष्टी आठवा तें। ५ ।

अति प्रिय आवडे तुळसी बुका। तैसीच प्रीति करी भोळ्या भाविका।
नामा पदपंकज पादुका। शिरी मस्तकीं वंदितसे। ६।

२८. उठा जागे व्हारे आतां। स्मरण करा पंढरिनाथा।
भावें चरणीं ठेवा माथा। चुकवा व्यथा जन्माच्या। १।
धन दारा पुत्रजन। बंधु सोयरे पिशुन।
सर्व मिथ्या हे जाणून। शरण रिघा देवासी। २।
मायाविघ्नें भ्रमलां खरे। म्हणतां मी माझेनि घरें।
हें तों संपत्तीचें वारें। साचोकारें जाईल। ३।
आयुष्य जात आहे पहा। काळ जपतसे महा।
स्वहिताचा घोर वहा। ध्यानी रहा श्रीहरीच्या। ४।
संत चरणी भाव धरा। क्षणक्षणा नाम स्मरा।
मुक्ति सायोज्यता वरा। हेंचि करा बापांनों। ५।
विष्णुदास विनवी नामा। भुलूं नका भवकामा।
धरा अंतरी निज प्रेमा। न चुका नेमा हरिभक्ति। ६।

२९. उठा उठा साधुसंत। साधा आपुलें हित।
गेला गेला हा नरदेह। मग कैंचा भगवंत। धु।
उठोनिया वेगेशीं। चला जाऊं राउळाशी।
जळती पातकाच्या राशी। काकड आरती देखिलिया। १।
उठोनियां पहाटे। विठ्ठल पहा उभा विटे।
चरण तयाचे गोमटे। अमृत दृष्टि अवलोका। २।
जागें करा रुक्मिणीवरा। देव आहे निदसुरा।
वेगें निंबलोण करा। दृष्ट होईल तयासी। ३।
पुढें वाजंत्रे वाजती। ढोल दमामे गर्जती।
होते काकड आरती। पांडुरंगरायाची। ४।

सिंहनाद शंख भेरी। गजर होतो महाद्वारी।
केशवराज विटेवरी। नामा चरण वंदितो। ५।

३०. उठा अरुणोदय प्रकाश जाहला। घंटा गजर गर्जिन्नला।
हरि चौघडा सुरू झाला। काकड आरती समयाचा। १।
महाद्वारी वैष्णव जन। पुजा सामुग्री घेऊन।
आले द्या तयासी दर्शन। बंदीजन गर्जती। २।
सभामंडपी कीर्तन घोष। मृदंग टाळ विणे सुरस।
आनंदे गाती हरीचे दास। परम उल्हास करुनियां। ३।
चंद्रभागे वाळवंटी। प्रात:स्नानाची जन दाटी।
आतां येतील आपुले भेटी। उठा उठा गोविंदा। ४।
ऐसें विनवी रुक्मिणी। जागृत जाहाले चक्रपाणि।
नामा बद्धांजुळी जोडुनी। चरणीं माथा ठेवितसे। ५।

३१. पिंगळा बोले महाद्वारीं। निशा सरली दिशा चारी।
उठा उठा हो श्रीहरी। उदयो प्रकाशला दिनकरी। १॥
देवा शकून ऐकावा। ध्रु०।
संत साधु अपरिमित। अवघा भरियेला थाट।
टाळ वीणे वाद्य वाजत। आवडी मंजुळ स्वरें गात। २।
नादें अंबर दणाणलें। तेहतीस कोटी देव मिळाले।
आवडी पहावया आले। स्वर्गसुखातें विसरले। ३।
आई रखुमाई माते। उठवा उठवा श्रीरंगातें।
नारद तुंबर गायनाते। कर जोडुनि हनुमंत। ४।
उठिला सांवळा वनमाळी। आनंदली भक्तमंडळी।
जयजयकारें पिटिली टाळी। विठ्ठल नामें दिधली आरोळी। ५।
पिंगळा आनंदला मनीं। तेज न माये गगनीं।
हर्षें घातली लोळणी। शिंपी नामा तुझे चरणीं। ६।

३२. उठा पांडुरंगा प्रभातसमयो पातला। वैष्णवांचा मेळा गरुड पारी दाटला। १ ।
वाळवंटापासुनि महाद्वारापर्यंत। सुरवरांची दाटी उभे जोडुनि हात। २ ।
शुकसनकादिक नारद तुंबर भक्तांच्या कोटी। कवाडा आडुनि पाहाताती जगजेठी। ३ ।
सुरवरांची विमानें गगनी दाटली सकळ। रखुमाबाई माते वेगी उठवा घननीळ। ४ ।
रंभादिक नाचती उभ्या जोडुनि हात। त्रिशूळ डमरु घेउनि आला गिरिजेचा कांत। ५ ।
पंचप्राण आरत्या घेऊनियां देवस्त्रिया येती। भावे ओंवाळिती राही रखुमाईचा पती। ६ ।
अनंत अवतार घेसी भक्तांकारणे। कनवाळु कृपाळु दीनालागी उद्धरणें। ७ ।
चौयुगांचा भक्त नामा उभा कीर्तनी। पाठमागें डोळे लावुनि उभी ते जनी। ८ ।

३३. उठा पांडुरंगा आतां दर्शन द्या सकळां। झाला अरुणोदय सरली निद्रेची वेळा। १ ।
संत साधु मुनि अवघे झालेती गोळा। सोडा शेजेसुख आतां पाहूं द्या मुखकमळा। २ ।
रंगमंडपी महाद्वारी झालीसें दाटी। मन उतावेळ रुप पहावया दृष्टी। ३ ।
राही रखुमाबाई तुम्हां येऊं द्या दया। शेजें हालउनी जागें करा देवराया। ४ ।
गरुड हनुमंत उभे पहाती वाट। स्वर्गीचे सुरवर घेऊनी आले बोभाट। ५ ।
झालें मुक्तद्वार लाभ झाला रोकडा। विष्णुदास नामा उभा घेऊनि काकडा। ६ ।

३४. अवताराची राशी तो हा उभा विटेवरी। शंख चक्रगदापद्मसहित हरी। १ ।
देखिला देखिला देवाआदिदेव बरवा। समाधान जीवा पाहतां वाटे ग माये। २ ।
सगुण चतुर्भुज रूपडें तेज पुंजाळती। वंदुनि चरणरज नामा विनवीतसे पुढती। ३ ।

या अभंगानंतर आरती म्हणावी.

३५. लाजलें गे माय आतां कवणा ओंवाळु। जिकडे पाहे तिकडे चतुर्भुज गोपाळु। १ ।
ओवाळू मी गेंले माय गेले द्वारके। जिकडे पाहे तिकडे चतुर्भुज सारिखे। २ ।
ओवाळू मी गेले माय सखिया माझारी। जिकडे पाहे तिकडे चतुर्भुज नरनारी। ३ ।
ओवाळूं मी गेले माय सारंगधरा। जिकडे पाहे तिकडे चतुर्भुज परिवारा। ४ ।
श्रीवत्सलांच्छन आता हीच ओळखण। विष्णुदास नामा येणे दावियेली खूण। ५ ।

आरतीनंतर वासुदेव व गौळण म्हणावी.

## वासुदेव

३६. बाबा अहंकार निशी घनदाट। गुरु वचनी फुटली पहाट।
माता भक्ति भेटली बरवंट। तिनें मार्ग दाविला चोखट गा। १ ।
नरहरि रामा गोविंदा वासुदेवा। धृ०।
एक बोल सुस्पष्ट बोलावा। वाचे हरि हरि म्हणावा।
संत समागमु धरावा। तेणें ब्रह्मानंद होय आघवा गा। २ ।
आला सीतळ शांतीचा वारा। तेणें सुख झाले शरीरा।
फिटला पातकाचा थारा। कळीकाळासी धाक दरारा गा। ३ ।
अनुहात वाजती टाळ। अनुक्षीर गीत रसाळ।
अनुभव तन्मय सकळ। नामा म्हणे केशव कृपाळु गा। ४ ।

## गौळण

३७. परब्रह्म निष्काम तो हा गौळियां घरी। वाक्या वाळे अंदु कृष्ण नवनीत चोरी। १ ।
म्हणती गौळणी हरीचीं पाउलें धरा। रांगत रांगत येतो हरी हा राजमंदिरा। २ ।
लपत छपत येतो हरी हा राजभुवनी। नंदासी ठाकूनी आपण बैसे सिंहासनी। ३ ।
सांपडला देव्हारी यासी बांधा दाव्यांनी। शंख चक्र गदा पद्म शारंगपाणी। ४ ।
बहुतां कष्टें बहुता पुण्यें जोडलें देवा। अनंत पवाडे तुमचे न कळती मावा। ५ ।
नामा म्हणे दातारा तुम्ही अहोजी केशवा। जन्मोजन्मी द्यावी तुमची चरणसेवा। ६ ।

'निवृत्ती ज्ञानदेव सोपान मुक्ताई एकनाथ नामदेव तुकाराम' हे भजन म्हणावे.

३८. संतभार पंढरींत। कीर्तनाचा गजर होत। १ ।
तेथे असे देव उभा। जैशी समचरणांची शोभा। २ ।
रंग भरे कीर्तनांत। प्रेमें हरिदास नाचत। ३ ।
सखा विरळा ज्ञानेश्वर। नामयाचा जो जिव्हार। ४ ।
ऐशा संतां शरण जावें। जनी म्हणे त्याला ध्यावें। ५ ।

हा अभंग म्हणून जय विठ्ठल जय जय विठ्ठल भजन म्हणावे.

## हरिपाठाचे अभंग

३९. नामाचा महिमा कोण करी सीमा । जपा श्रीरामा एक्याभावें। १ ।
न लगती स्तोत्रे नाना मंत्र तंत्रे । वर्णिजे वक्त्रें श्रीरामनाम । ध्रु०।
अनंत पुण्यरासी घडे ज्या प्राण्यासी । तरीच मुखासी नाम येत। ३ ।
नामा म्हणे राम हा जप परम। तो देह उत्तम मृत्युलोकी। ४ ।

४०. जन्माचें कारण रामनाम पाठें। जाईजें वैकुंठें एक हेळां । १ ।
रामनामा ऐसां जिव्हे उमटे ठसा । तो उद्धरेल अपैसा इहलोकीं। २ ।
दो अक्षरीं राम हा जप परम। नलगे तुज नेम नाना पंथ । ३ ।
नामा म्हणे पवित्र श्रीरामाचें चरित्र । उद्धरसि गोत्र पूर्वजेंसी। ४ ।

४१. विषयांचें कोड कां करिसी गोड। होईल तुज जोड इंद्रियबाधा । १ ।
सर्व हें लटिके जाणुनि तूं निकें । रामेंविण एके न सुटिजे। २ ।
मायाजाळमोहो इंद्रियांचा रोहो। परि न धरिसी भावो भजनपंथे। ३ ।
नामा म्हणे देवा करी तूं लवलाहो। मयूराचा टाहो घन गर्जे। ४ ।

४२. कांसवीचे दृष्टी जै होईजे भेटी। तै अमृताची वृष्टि घडे त्यासी। १ ।
तैसें हें भजन श्रीरामाचे ध्यान । वाचे नारायण अमृतमय। २ ।
धन्य त्याचे कुळ सदां पै सुफळ। दिननिशी फळ रामनाम । ३ ।
नामा म्हणे चोखट भक्त तो उत्तम। वाचेसी सुगम रामनाम। ४ ।

४३. सदा फळ सुफळ वाचेसी गोपाळ। वंदि कळिकाळ शास्त्र सांगे। १ ।
ब्रह्मांडनायक ऐंसे जें कवतुक । तेचि नाम एक श्रीकृष्ण ऐसें। २ ।
आदी अंत पाहतां नाही पै सर्वथा। परिपूर्ण सरीता अमृताची। ३ ।
नामा म्हणे अनंत कां करीसी संकेत। उद्धरिले पतीत युगायुगीं। ४ ।

---

हरीपाठाचे प्रत्येक अभंगानंतर 'न लगती स्तोत्रे नाना मंत्र तंत्रे । वर्णिजे वक्त्रे श्रीरामनाम' हे धृपद म्हणावे.

४४. गोविंद गोपाळ वाचेसी निखळ। तो उद्धरे तात्काळ कलीमाजी। १ ।
नारायण नारायण हेंचि पारायण। उद्धरले जन इहलोकी । २ ।
तुटती यातना कर्माच्या भावना। जड जीव उद्धरणा नाम स्मरा। ३ ।
नामा म्हणे राम हा जप परम। न लगती नेम नानाकोटी। ४ ।

४५. तीर्थ तपरासी जप हृषीकेशी। नाम अहर्निशी रामराम। १ ।
तीर्थांचे पै तीर्थ नाम हें समर्थ। होईल कृतार्थ रामनामें। २ ।
साधेल साधन तुटेल बंधन। वाचे जनार्दन सुफळ सदा । ३ ।
नामा म्हणे हरी उच्चार तूं करीं। उद्धरसी निर्धारी इहलोकी। ४ ।

४६. पाहता ये परिपाठी आणीक नाहीं सृष्टी । नामेविण दृष्टी न दिसे माझे। १ ।
नामचि समर्थ नामचि मथीत। शंकरासी हेत रामनामी। २ ।
पुरती सर्व काम वाचे रामनाम। न लगती ते नेम कर्मजाळ। ३ ।
नामा म्हणे उच्चार न करी तूं विचार। तुटेल येरझार नाना योनी। ४ ।

४७. तपांचे पै तप राम हें अमुप। करी कां रे जप रामनामी। १ ।
रामकृष्ण म्हणे वाचे नारायण। तुटेल बंधन यमपाश। २ ।
साधेल साधन होती कोटी यज्ञ। नाम जनार्दन जप करी। ३ ।
नामा म्हणे जिव्हे नाम स्मरण करी। म्हणे नरहरी एक भावें। ४ ।

४८. हाचि नेम सारी साधेल तो हरी। नाम हे मुरारी अच्युताचें। १ ।
गोविंद हरे गोविंद हरे। यादव मुरारे रामनाम। २ ।
न लगती कथा नाना विकलता। राघवाचे स्मरतां नाम वाचे । ३ ।
नामा म्हणे राम आम्हा हाचि नेम। नित्य तो सप्रेम जप आम्हां। ४ ।

४९. करूं हें कीर्तन राम नारायण। जनीं जनार्दन हेंचि देखें। १ ।
जगाचा जनक रामकृष्ण एक। न करितां अविवेक स्मरे राम। २ ।
तुटेल भवजाळ कां करिसी पाल्हाळ। सर्व मायाजाळ इंद्रिय बाधा। ३ ।
नामा म्हणे गोविंद स्मरे तूं सावध। नव्हे तुज बाध नानाविघ्नें। ४ ।

५०. मायेंचे भूचर रज तम सात्विक। रामनाम एक सोडवणों। १ ।
राम हेंचि स्नान राम हेंचि ध्यान। नामें घडे यज्ञ कोटी देखा । २ ।
न लगती साधन नाना मंत्र विवेक। रामनामीं मुख रंगी कां रे। ३ ।
नामा म्हणे श्रीराम हेंचि वचन आम्हां । नित्य ते पौर्णिमा सोळा कळी। ४ ।

५१. माझें मी करिता गेले हे दिवस। न धरीच विश्वास रामनामीं। १ ।
अंती तुज उद्धरती रामकृष्ण हरी। राम पंचाक्षरी मंत्रसार। २ ।
कां करशील सांठा प्रपंच विस्तार। न तुटे येरझार नामेंविण। ३ ।
नामा म्हणे कैंसे रामनामीं पिसें। तो उद्धरेल अपैसे इहलोकी। ४ ।

५२. नको नको माया सांडी लवलाह्या। पुढील उपाया झोंबें कां रें। १ ।
रामनाम म्हणे तुटेल बंधन। भवबंध मोचन एकानामें। २ ।
स्मरतां पतीत उद्धरले यथार्थ। नाम हाचि स्वार्थ तया झाला । ३ ।
नामा म्हणे हा जप करी तूं अमूप। नामें चुकली खेप इये जनीं। ४ ।

५३. स्मरण करितां रामनाम ध्वनी। ऐकतांची कर्णी पळती यम । १ ।
ऐसें पाठ करी रामकृष्ण हरी। होतील कामारी रिद्धीसिद्धी। २ ।
साध्य तोंचि साधी न करी उपाधि। जन्मांतरींच्या व्याधि हरती नामें। ३ ।
नामा म्हणे सर्व राम हाचि भाव। नाही आणिक देव रामेंविण। ४ ।

५४. रामकृष्ण माळ घाली कां अढळ। तुटेल भवजाळ मायामोह। १ ।
होशील तूं साधु न पवसी बाध। पूर्ण ब्रह्मानंद पावेल तुज । २ ।
जपतां रामनाम पुरती सर्व काम। आदि अंती नेम साधेल तुज। ३ ।
नामा म्हणे कृतार्थ पूर्ण मनोरथ। न लगती ते अर्थ माया फासें। ४ ।

५५. शरीर संपत्ती मायेचे टवाळ। वायांची पाल्हाळ मिरवितोसी। १ ।
नाम हेंचि तारी विठ्ठल निर्धारी। म्हणे हरी हरी एकी हेळा । २ ।
स्मरतां गोपाळनाम वंदील काळयम। न लगती नेम मंत्रबाधा। ३ ।
नामा म्हणे सार मंत्र तो उत्तम । राम हेंचि नाम स्मरें कां रे । ४ ।

५६. भवाब्धि तारण रामकृष्ण नांव। रोहिणीची माव सकळ दिसे। १।
नाम हेंचि थोर नाम हेंचि थोर। वैकुंठी बिढार रामनामें। २।
राम हे निशाणी जपताची अढळ। वैकुंठ तत्काळ तया जीवा। ३।
नामा म्हणे वैकुंठ नामेंचि जोडेल। अंती तुज पावेल नाम एक। ४।

५७. जळाचा जळबिंदु जळींच तो विरे। तैसें हें विघरे पांचां ठायी। १।
जीवशीव हे उच्चार नाम हें मधुर। जिव्हेसी उच्चार रामनाम। २।
रामनाम तारक शिव षडाक्षरी। तैसी वाचा करी अरे मूढा। ३।
नामा म्हणे ध्यान शिवाचें उत्तम। मंत्र हा परम रामनाम। ४।

५८. करितां हरिकथा नाम सुखरासी। उद्धार जीवाशी एका नामें। १।
तें हें रामनाम जप तूं सप्रेम। जप हा सुगम सुफळ सदा। २।
नामेंचि तरले नामेंचि तरले। नाम म्हणतां गेले वैकुंठासी। ३।
नामा म्हणे एक नामेंसी विनटे। ते वैकुंठीचे पेठे पावले देखा। ४।

५९. नामावाचूनि काहीं दुजें येथें नाहीं। वेगी लवलाही राम जपा। १।
गोविंद गोपाळ वाचेसी रसाळ। पावसी केवळ निजपद। २।
ध्रुव प्रल्हाद बळी अंबऋषि प्रबुद्ध। नामेंचि विद्रद पावले देखा। ३।
नामा म्हणे राम वाचे जया नाम। संसाराचे श्रम हरे नामें। ४।

६०. म्हणतां वाचे नाम वंदी तया यम। काळादिकासम वंदी तया। १।
ऐसें नाम श्रेष्ठ सकळांसी वरिष्ठ। उच्चारितां नीट वैकुंठ गाजे। २।
तो हा नाममहिमा वाखाणीत ब्रह्मा। न कळे तया उपमा आदिअंती। ३।
नामा म्हणे पाठें नामाचेनि वाटे। तरी प्रत्यक्ष प्रगटे विठ्ठल हरी। ४।

६१. कृष्णनाम श्रेष्ठ गाताती देवऋषि। नाम अहर्निशी गोपाळाचे। १।
हरि हरि हरि तूंचि बा श्रीहरी। वसे चराचरी जनार्दन। २।
आदि ब्रह्म हरी आळवी त्रिपुरारि। उमेप्रती करी उपदेश। ३।
नामा म्हणे पूर्ण हा जप उत्तमोत्तम। शंकरासी नेम दिनदिशीं। ४।

६२. कां करितोसी शीण वाचे नारायण। जपतां समाधान होईल तुज। १।
राम कृष्ण हरी गोविंद गोविंद। वाचेसी हा छंद नामपाठ। २।
वंदितील यम कळिकाळ सर्वदा। न पवसी आपदा असतां देही। ३।
नामा म्हणे वोळगे सीण झाला सांगे। प्रपंच वाउगे टाकीं परते। ४।

६३. नामाचेनि पाठें जातील वैकुंठे। तो पुंडलिक पेठे प्रगट असे। १।
विठ्ठल विठ्ठल मंत्र सांगतसे शास्त्र। आणिक नाहीं शस्त्र नामेंविण। २।
पुराण व्युप्तत्ति न लगती त्या श्रुती। हरीनाम पंथी मुनि गेले। ३।
नामा म्हणे हरी नामेंचि उद्धरी। जन्माची येरझारी हरे नामें। ४।

६४. सर्वांभूती भज नमन करी संता। नित्य त्या अच्युता स्मरण करी। १।
ऐसें भजनी विनट सांपडेल वाट। रामकृष्ण नीट वैकुंठींची। २।
न लगती साधने वायांचि बंधनें। एका नामें होणे चतुर्भुज। ३।
नामा म्हणे थोर नामेंचि सधर। वैकुंठी बिढार तया भक्तां। ४।

६५. तूं तंव नेणता परी हरि जाणता। आहे तों समता सर्वांभूतीं। १।
सर्व ब्रह्म हरी येकचि निर्धारी। होसील झडकरी ब्रह्म तूंचि। २।
अच्युत माधव अमृताच्या पाठें। लागतांची वाटे वंदी यम। ३।
नामा म्हणे होसील जिवलग विष्णूचा। दास त्या हरीचा आवडता। ४।

६६. कां करिसी सोस मायेचाअसोस। नव्हे तुज सौरस नामेंविण। १।
नामचि हा मंत्र नामचि हो तंत्र। नामेंविण पवित्र न होसी देखा। २।
तिही लोकी पाहता नामेंविण सर्वथा। अच्युत म्हणता पुण्य कोटी। ३।
नामा म्हणे ब्रह्म आदिअंती नेम। तें विटेवरी सम उभें असे। ४।

६७. पवित्र परिकर नाम हा उच्चार। उद्धरण साचार जगा यया। १।
गोविंद केशव उच्चार श्रीराम। न लगती नेम अमूप जप। २।
तें हें विठ्ठलरूप पिकलें पंढरी। नाम चराचरी विठ्ठल ऐंसे। ३।
नामा म्हणे विठ्ठल सर्वांत सखोल। उच्चारितां मोल नलगे तुज। ४।

६८. पोसिशी शरीर इंद्रियांचा बांधा। सेखी ते आपदा करील तुज। १ ।
नव्हे तुझे हित विषय पोषिता। हरी हरी म्हणता उद्धरसी। २ ।
वायांच पाल्हाळ चरित्र सांगसी। परी राम हें न म्हणसी अरे मूढा। ३ ।
नामा म्हणे हेंचि पंढरीये निधान। उच्चारितां जन तरले ऐसे। ४ ।

६९. विषय खटपट आचार सांगसी। विठ्ठली न भजसी अरे मूढा। १ ।
पूर्णब्रह्म हरी विठ्ठल श्रीहरी। अंती हा निर्धारी तारील सत्य। २ ।
न लगे सायास करणे उपवास। रामाचा विश्वास ऐसा धरी। ३ ।
नामा म्हणे प्रेम धरी तू सप्रेम। विठ्ठल हाचि नेम दिननिशीं। ४ ।

७०. नव्हे तुज हित विषय पोशितां। हरी हरी म्हणता तरशील। १ ।
माधव श्रीहरी कृष्ण नरहरी। वेगीं हा उच्चारी लवलाही। २ ।
घडतील यज्ञ पापें होतील भग्न। प्रपंच सर्वज्ञ होईल ब्रह्म। ३ ।
नामा म्हणे हरिकथा हरी भवव्यथा। उद्धरसी सर्वथा भाक माझी। ४ ।

७१. उपदेश सुगम ऐके रे तूं एक। नाम हे सम्यक विठोबाचे। १ ।
जनीं जनार्दन भावचि संपन्न। विठ्ठल उद्धरण कली माजी। २ ।
साधेल निधान पुरेल मनोरथ। नामेचि कृतार्थ होती जन। ३ ।
नामा म्हणे नाम घेई तूं झडकरी। पावसी निर्धारी वैकुंठपद। ४ ।

७२. सर्वांगे साजिरीं आहेति इंद्रिये। तंव सावध तूं होय हरिकथे। १ ।
कीर्तनी नर्तन वाचे जनार्दन। न पवसी पतन येरझारी। २ ।
पूर्ण मनोरथ घडती एका नामें। दाटेल सप्रेमे जीवन हेतूं। ३ ।
नामा म्हणे विलास न करी तूं आणिक। सर्वी सर्व एक नाम असे। ४ ।

७३. सोपा हा सुगम उपावो परीस। धरी तूं विश्वास नाम महिमा। १ ।
नाम हेचि गंगा नाम हेचि भीमा। अंतरी श्रीरामा जपिजेसु। २ ।
अमृत सुरस राम नाम एक। वाचेचें वाचक मन करीं। ३ ।
नामा म्हणे सुरस एक राम रस। ध्यायीं केशवास दिननिशीं। ४ ।

७४. म्हणतां नाम वाचें वैकुंठ जवळीं। नित्य वनमाळी भक्ता संगे। १ ।
होईल साधन विठ्ठली परिपूर्ण। निवती नयन मूर्ति पाहता। २ ।
शंखचक्रांकित आयुधें शोभती। भाग्योदयीं येती भावशीळा। ३ ।
नामा म्हणें तें रूप पंढरीये आहे। न सोडी तूं सोये केशवाची। ४ ।

७५. रुपाचें रूपस नाम हृषीकेश। पंढरी निवास जप करी। १ ।
विठ्ठल श्रीहरी मुकुंद मुरारी। नामेचि बोहरी प्रपंच्याची। २ ।
विठ्ठलाचें नाम हेंचि जीवन हेत। नाम हें अमृत केशवाचे। ३ ।
नामा म्हणे देव अमृताचा साठा। मुखामाजी पैठा होत नामें। ४ ।

७६. सार हें पै नाम विठोबाचे आहे। दिननिशीं सोये मना लावी। १ ।
गुंफिजेल मन जोडिती पाऊलें। तुटे ते घातले मायाजाळ। २ ।
नामचि कारण जप पैं सुफळ। उद्धार निर्मळ सकळ जीवा। ३ ।
नामा म्हणे तो हा विठ्ठल पंढरी। नाम चराचरीं अमृतमय। ४ ।

७७. विठ्ठल नामीं आळस न करी गव्हारा। वायाविण येरझारा शिणतोसी। १ ।
हरि उच्चारण करी हा विचार। नाम हें साचार उद्धरण। २ ।
मी म्हणता अहंता वाढे हे सर्वथा। हरि भजन पंथा नाही मार्ग। ३ ।
मायाजाळ विषय तोडी तोडी सांठा। विठ्ठल नाम पाठा वोळगे जना। ४ ।
सर्वहि लटिके मायाजाळ फिके। रामेवीण एके नाही दुजे। ५ ।
नामा म्हणे उपदेश भजे केशवास। वैकुंठ निवास वोळे तुज। ६ ।

७८. हरिनाम पाठ हाचि भावो। हरि हरि हाचि देवो।
हरिविण न फिटे संदेहो। सर्व जीवांचा जाण पां। १ ।
हरि सत्य ज्या देहीं। तोचि तरला येथ पाही।
हरिविण भवडोहीं। तरण कैसें घडेल। २ ।
रामकृष्ण वासुदेवा। हाचि सर्व जीवांचा विसावा।
ऐसा पुकारुनिया धांवा। विठ्ठल नाम उच्चारी। ३ ।

नामा जपें हृदयीं सदां। रामकृष्ण हाचि धंदा।
हरिनाम परमानंदा। हाचि जप जपतसें। ४ ।

नामदेव जनाबाई नामदेव जनाबाई हे भजन करावे.

हरीपाठ अभंग समाप्त.

## संध्येतील चोवीस नामांनी भगवंतांची केलेली आळवणी संत नामदेवांना संध्या ज्ञात होती.

७९. येईं गे केशवे मज तुझी सवे। तुजविण नुगवे दिनु माये। १ ।
तूं माय जननी कांसवी कौसल्या। दिन बहुसाळ मज पावें। २ ।
न मागें केवळ विषयांचे टवाळ। तूं माझी कृपाळ विठ्ठलमाय। ३ ।
वोळली गगनी केशव कामधेनु। लवतां लोचन स्फुरे बाह्या। ४ ।
वाजवील वाद्य गोपाळांची मांदी। आल्हाद गोविंदी नित्य माझा। ५ ।
नामा म्हणे केशव येई कामधेनु। तेणें माझी तनु तृप्त सदा। ६ ।

८०. येईं गे नारायणी अमृत संजीवनी। चिंतिता निर्वाणीं पावें वेगीं। १ ।
तूं माझें जीवन नाम नारायण। नित्य अनुष्ठान तुझ्या नामें। २ ।
बाह्य अभ्यंतरी तूचि सर्वांठायी। तुजविण सृष्टी शून्य दिसे। ३ ।
चाल लवलाह्या कृपाळू तूं माये। मज हें न साहे मोह जंजाळ। ४ ।
तुटेल बिरडें सुटतील गांठी। जंव तूं जगजेठी येशील माये। ५ ।
नामा म्हणे धन्य तुझें नाम साचें। उच्चारितां वाचे निवती अंगे। ६ ।

८१. येईं गे माधवे पार्जी प्रेमपान्हा। विषयाचा आंदणा नको करूं। १ ।
धांव तूं मधूकरे माधवे उदारे। येईं तूं सोइरे जननिये। २ ।
कष्टलो मी भारी शीण दूर करी। येईं तू झडकरी माधवे वो। ३ ।
अनंत वो नामें पुराणे पढती। पावसी आकांती विठ्ठले वो। ४ ।
नामा म्हणे लाहो करावा माधवे। माझेनि वो जीवें लाहे चाड। ५ ।

८२. येईं तूं गोविंदे नामामृत धारी। नित्य हें उच्चारी गोविंदाते। १ ।
गोविंद गोविंद नित्य हाचि छंद। पावें तूं हृद्रद आदिरूपें। २ ।
गोविंद हो ध्याने निवती अष्टांगे। गोविंदे गे वेगें वेष धरूं। ३ ।
गोविंद गोपाळ मुकुंद केसरी। येई तूं लवकरी सांवळिये। ४ ।
गोविंद हें नाम जनी वनी दिसे। प्रत्यक्ष तें ठसे पंढरीसी। ५ ।
वेणूनादी काला गोविंदे पै केला। धावतचि आला पेंद्यापाशी। ६ ।
ती हीच वो माय उभी बाळमूर्ती। नाम जे जपती पांडुरंग। ७ ।
नामा म्हणे पांग गोविंद हा दवडी। वेगें लवडसवडी करीं माये। ८ ।

८३. येई तूं विष्णू हरि पावे लवकरी। ब्रीद चराचरी सांगे मुनी। १ ।
वैकुंठवासिनी कृष्णविष्णुदेव। नामातें गौरव आम्हालागीं। २ ।
धन्य हाचि दिनु विष्णुमाय पावे। गगनी उगवे सूर्य जैसा। ३ ।
आदि ब्रह्मा हरि विष्णुकृष्णगंगा। भागिरथी पैं गा पदी पावे। ४ ।
गया तें प्रयाग काशी तें सर्वांग। विश्वेश्वर लिंग चराचर। ५ ।
विष्णुगंगाधर विष्णुनाम पाठ। उच्चारितां वाट वैकुंठीची। ६ ।
नामा म्हणे विष्णु भागिरथीमाजी। पंढरीये माझी विठ्ठलमाय। ७ ।

८४. येईं तूं मधुकरे मदनसुंदरे। मज गे न धरे प्रेम पोटी। १ ।
तूं माझी जननी मधुसूदन गाय। कामधेनु होय कांसवीची। २ ।
आनंद निजधने जुनाट मधुसूदने। शुकस्तनपान पाजी पान्हा। ३ ।
केशव कांसवी पद रामगाय। आत्माराम होय निःसंदेह। ४ ।
विठ्ठलमुकुंदे स्वरूपे गोमटी। आकांतली सृष्टी मधुसुदनें। ५ ।
शंखचक्रांकित आयुधें मंडीत। मुकुट शोभत तुझा शिरीं। ६ ।
भक्तवरदायनी मधुसूदनगंगा। व्हावे तू वो वेगा कामधेनु। ७ ।
नामा म्हणे माये मधुसुदन गाय। ते संजीवनी होय आम्हांलागीं। ८ ।

८५. येईं वो त्रिविक्रमे पूर्ण पान्हा देईं। कामधेनु होईं विठ्ठलराजे। १ ।
त्रिविक्रमे धरे येई तूं सांवळे। मुकुंद गोपाळे केशवे वेगी। २ ।
तू माझे निजधन त्रिविक्रमधरे । गंगानाममात्रें भंगी पाप । ३ ।
त्रिपदागायत्री त्रिविक्रममुखें । जनाची वो दुःखे हरती नामें। ४ ।
त्रिजया त्रिफणी भागीरथी वेणी । प्रयाग वो धुनी पाप जाळी। ५ ।
त्रिस्थळी त्रिमाये त्रिविक्रम होय। विश्वेश्वर दोहे तारक ब्रह्म। ६ ।
काशी कांची माये अयोध्या द्वारका । मथुरा अवंतिका तूंचि माये। ७ ।
नामा म्हणे माझी त्रिविक्रम गाय। भक्तिसी पान्हाये पंढरपुरीं। ८ ।

८६. येईं वो वामने खुजीयखुजटे । पंढरीचे पेठे उभी राहें। १ ।
येईं वो डोळसे सांवळे तेजसे। वामने बहु वसे ब्रह्मचारी। २ ।
अनंत विद्रदे अनंत अपार। कैवल्य वोसरे पदकमळे। ३ ।
तुझे नाम धन्य वामन साजिरें । रुप हें गोजिरें बळीच्या द्वारी । ४ ।
तुझ्या चरणी तीर्थे उद्धरती सर्व। येईं तू सत्वर वामनाई । ५ ।
नामा म्हणे पावे वामन ब्रह्मांडे। स्वरूप वितंडे ब्रह्मचारें। ६ ।

८७. येईं वो श्रीधरे सर्व रूपसारे। कैवल्य उत्तरे अभिनव। १ ।
श्रीधर श्रीरंगे नाम पांडुरंगे। प्रगट वो सांगे पूर्णधन। २ ।
श्रीकरे श्रीधरे शोभा ते साचारे। चक्रांकित करे शंख तुझा। ३ ।
सुंदर श्यामळ नाम हे अढळ। मुखी हो वेल्हाळ हस्त तुझे। ४ ।
प्रकाशे हा पूर्ण श्रीधरे पैं जाण। सांगितली खूण खेचराने। ५ ।
नामा म्हणे माता श्रीधर उच्चारू। तरेन साचारू तिन्ही लोकीं। ६ ।

८८. येईं हृषिकेशी दिव्यरूप दिसे। मन हें उल्हासे भेटीलागी। १ ।
हृषिकेशी नामें तरले संभ्रमे। नित्य रामनामें भवसिंधू। २ ।
आराधने धन ऋषीसी संपूर्ण। नाम कोटी यज्ञ झालें तया। ३ ।
पावन हृषिकेशी हेंचि ध्यान मन। नाम सनातन हृषिकेशी। ४ ।

विश्वा करी कळा विश्वजन लीळा । त्राहे वेळोवेळां हृषीकेशी । ५ ।
नामा म्हणे माय येई हृषिकेश । झालों कासावीस तुजवीण। ६ ।

८९. येईं वो पद्मनाभे पंकजलोचने। विश्व पूर्णघने देखे तुज । १ ।
त्राहें पद्मनाभा वाचा सिद्ध पावे। मज हें नुगवे मायाजाळ। २ ।
पद्मांकित रेखा पद्म हें सुरेख । पावे वो निमिष्य एकमाये । ३ ।
विचरे हे पृथ्वी नाम पद्मनाभ। स्वयंभावो बिंब विठ्ठलेसी । ४ ।
रिकामी मी नसें दिननिशी निमिष्य। पद्मनाभ साक्ष हृदयी भोगी । ५ ।
नामा म्हणे पद्मनाभ हें हो नाम। जपतुसे प्रेम देईं मज। ६ ।

९०. येई वो दामोदरे पवित्र हे करे। मना हो नावरे प्रेमलोट। १ ।
पाहें कृपादृष्टी साहे जगजेठी। पूर्ण पान्हा घोटी ऐसें करी। २ ।
दामोदरे नाम मदन परिकरे। हाचि वो विचार मनें केला। ३ ।
येईं तूं निर्धारें पावें तूं झडकरी। येईं वो लवकरी दामोदरे। ४ ।
दामोदर माता पाहे वो समता। पावे वो निवांता पावे वेगीं। ५ ।
नामा म्हणे लोटूं प्रेमामृत निवटूं। नामेंचि वैकुंठे दामोदरे। ६ ।

९१. येईं तूं कृपाळे संकर्षण माते। पवित्र पूर्णभरिते गुणनिधि। १ ।
त्राहेत्राहे वेगी पावे वो झडकरी। ब्रीद चराचरीं वर्णिताती। २ ।
संकर्षण गंगा सर्वांगी तूं असे। जनी वनी दिसें रूप तुझे। ३ ।
निर्धारु सांगतां न माये वो घेता। संकर्षण माता पाव वेगी। ४ ।
विष्णुसंकर्षण नाम हें गहन। पतितपावन चरणरजें। ५ ।
नामा म्हणे माय संकर्षण गाय। हरिदासा पान्हावे पंढरीसी। ६ ।

९२. येईं तूं शारंगे वासुदेवे त्वरें। वासुदेवे सारे गोपाळे वो। १ ।
त्राहे वासुदेवा पावें झडकरी। त्वरें वेगू करी आर्त भेटी। २ ।
वासुदेवनामें साधन सुगम। योगिया विश्राम स्थान झालें। ३ ।
द्वादश अक्षर जपिन्नला ध्रुरु। तयासी साचारू अढळपद। ४ ।

बळी भीष्मदेवी वासुदेवी भाव। रोहिणीची माव ऐसे झालें। ५ ।
नामा म्हणे भक्त वासुदेवीं रत। सायुज्य पावे तो एक्यानामें। ६ ।

९३. येईं तूं प्रद्युम्ने ध्यान तूं धरणे। माझिये कल्पने निर्धारुसा। १ ।
त्राहे झडकरी पावे वो लवकरी। प्रद्युम्ने फुत्कारी वेळोवेळां। २ ।
सांवळे सुंदरे वेणु वाहे करे। ध्यान हें सुंदर यमुनातटी। ३ ।
प्रवाह प्रद्युम्ने नामघोष दाट। जिंकिले जुनाट पापराशी। ४ ।
नामा म्हणे नाम धन्य हें प्रद्युम्न। होईल संपन्न नाम घेतां। ५ ।

९४. येईं वो अनिरूद्धे सांवळे प्रबुद्धे। विराटे गोविंदे पाव वेगीं। १ ।
त्राहे माउलीये मना तुझी सोय। चुकती अपाय नाम घेता। २ ।
अनिरुद्ध पाठे जाईन वैकुंठे। पुंडलीक पेठे उभा असे। ३ ।
कटावरी कर सांवळी सुंदर। मनाचा विचार इच्या चरणी। ४ ।
अनिरुद्धसार अनु नाही आधार। सर्वही विचार अनिरुद्धे। ५ ।
नामा म्हणे येईं अनिरुद्धे माये। आणिक उपाय न लगे मज। ६ ।

९५. येईं तूं पुरुषोत्तमे संजीवनी रामे। योगिया विश्रामे पुरुषश्रेष्ठा। १ ।
त्राहे मनोधर्म नाम पुरुषोत्तम। साधन आगम ऐसी माये। २ ।
येईं वो सांभाळी लवलाहे मने। जुनाट हो जुने पुरुषोत्तमें। ३ ।
तुझे नाम धन्य पुरुष हें सौजन्य। द्वैत हें अभिन्न अद्वैत हें। ४ ।
एकाक्षरी नाम पुरुष शुचिसम। नाम आत्माराम पुरुषोत्तम। ५ ।
नामा म्हणे पावें पुरुषोत्तम माते। सर्वत्र अद्वैत एकरुप। ६ ।

९६. येईं वो अधोक्षजे वैकुंठ विराजे। नाम गे सहजे अमृतरासी। १ ।
अधोक्षज नामें घालीन गोंधळ। रिता एक पळ जाऊं नेदी। २ ।
अधर हे रंगी अधोर्ध्व सेवीन। सर्वत्र पाहीन अधोक्षज। ३ ।
अरिष्ट हें निरसी माये अधोक्षजे। ऐसी या पाविजे संकटी त्वां। ४ ।
अरि हे मर्दन अधोक्षज जाणें। स्वीकारावे पूर्ण प्रगटतां। ५ ।
नामा म्हणे धांवे अधोक्षज पावे। दिशाद्रुम भावें तुज मग। ६ ।

९७. येईं वो केसरी नरसिंह उच्चारी। पवित्र साचारी तिही लोकी। १ ।
नरसिंह वामन प्रल्हाद रक्षण। आमुचें तें धन नाम तुझें। २ ।
शंखचक्र करी पावे वो लवकरी। येईं तूं केसरी लवलाहे। ३ ।
नरसिंह हें नाम नरसिंह हें प्रेम। उत्तमोत्तम तिन्ही लोकीं। ४ ।
त्रिपुररक्षक दानवमर्दन। विकटवदन पंचाक्षरी। ५ ।
नामा म्हणे हरि नाम नरकेसरी। नरसिंह उच्चारी तरती जीव। ६ ।

९८. येईं वो अच्युते नामामृत रसे। सुंदर डोळसे जान्हवीये। १ ।
अमृताची खोटी अच्युतनाम पेठी। पावे वो जगजेठी अच्युतसार। २ ।
अच्युत अच्युत नामें हेंचि सत्य। हें पियूष त्वरित उच्चारितां। ३ ।
वैकुंठीची मूर्ति अच्युतनाम पाठे। प्रत्यक्ष वो भेटे विटेवरी। ४ ।
पुंडलीक दृष्टी नयनाची भेटी। निवारितां दृष्टी न्याहाळितां। ५ ।
नामा म्हणे अच्युत नाम हेंचि आम्हा। दिननिशी राम जपतसें। ६ ।

९९. येईं जनार्दने जनवनसंपन्ने। माझे वो चिद्घने पांडुरंगे। १ ।
त्राहे जनार्दने पूर्णानंदघने। येई वो संपन्ने विश्वंभरे। २ ।
नाम हें दुर्लभ जनकजननी। राम जनार्दनी विनटली। ३ ।
सांवळी डोळस रवि एकासनी। तेज प्रकाशनी हिरियाची। ४ ।
जननी ते जननी निकट ते जीवनी। जग प्रगटिणी हरीयाची। ५ ।
नामा म्हणे जन नाम जनार्दन। सनकादिक जाण सेवितातो। ६ ।

१००. येईं तूं उपेंद्रे विठ्ठल महिंद्रे। देवामाजी भद्रे सिंहासनी। १ ।
त्राहे वो जननी शिणलों गे माये। तुजविण आहे कवण मज। २ ।
तूं माझे कारुण्य प्रत्यक्ष सौजन्य। विचारतां प्रवीण प्रबुद्ध हो। ३ ।
पावे वो तूं वेगी उपेंद्रे गे माते। पुंडलिक सांगाते पंढरीसी। ४ ।
दीपकु लाविला दिन उगवला। दीपकें फळला पांडुरंग। ५ ।
नामा म्हणे नाम उपेंद्र ऐसे शम। पावेन विश्राम नाम घेंता। ६ ।

१०१. येईं तूं हरीरूपे विठ्ठल स्वरूपे। कळिकाळ कांपे नाम घेतां। १ ।
नामें हरिहरि त्राहे वो झडकरी। शिणलों मी भारी जननीये। २ ।
हरिनामधन सर्व जनार्दन। हरी हें आठवण जिव्हेसदा। ३ ।
हरीहरी म्हणतां हरीरुप संता। नाम हें अनंताक्षर विलसे। ४ ।
येईं तूं हरी गंगे सांवळे सुरंगे। हरीहरी संगे रतलोंसे। ५ ।
नामा म्हणे हरी पांडुरंग माझा। चरण हो भोजा राज्य धरू। ६ ।

१०२. येईं वो तूं कृष्णे हरी माझिये तृष्णे। दिननिशी प्रष्णे वाट पाहें। १ ।
त्राहे कृष्णगंगे सांवळे सारंगे। नामस्मरण वेगें पुरे आम्हा। २ ।
रामकृष्ण टाहो नामें लवलाहो। फिटला संदेहो संसाराचा। ३ ।
उद्धव अक्रूर यादव सादर। कृष्णाते अपार तयालागी। ४ ।
अर्जुन द्रौपदी स्मरण गोविंदीं। पावावे निजपदी नामा म्हणे। ५ ।

संध्येतील नामावली समाप्त.

## संध्येतील संकलीत नामावली

१०३. केशव कैवल्य कृपाळ। नारायणे उद्धरिला अजामेळ।
माधव मनीं धरा निश्चळ। गोविंद गोपाळ गोकुळीचा। १ ।
विष्णु विश्वाचा जिव्हाळा। मधुसूदन माउली सकळां।
त्रिविक्रमें रक्षिले गोकुळा। वामनें पाताळा बळी नेला। २ ।
श्रीधरें धरा धरिली पृष्ठी। हृषिकेश उभा भीवरेतटी।
पद्मनाभ पुंडलिकासाठी। दामोदरें गोष्टी पांडवांशी। ३ ।
संकर्षणे अर्जुनासी संवाद केला। वासुदेवें अवचितां वाळी वधिला।
प्रद्युम्न समुद्रावरी कोपला। अनिरूद्धे छेदिला सहस्रबाहो। ४ ।
पुरुषोत्तमे केला पुरुषार्थ। अधोक्षजें हिरण्यकश्यपा मारिली लाथ।
नरहरी प्रल्हादा रक्षित। स्मरावा अच्युत स्वामी माझा। ५ ।
जनार्दने रावणादि वधिले। उपेंद्रे अहिल्येसी उद्धरिले।
हरिहरि म्हणतां दोष जळाले। कृष्णे तारिले गणिकेसी। ६ ।

या चोवीस नामांचे करिता स्मरण। जन्ममरणांचे होय दहन।
विष्णुदास नामा करी चिंतन। चरण ध्यान मज देईं। ७ ।

१०४. केशव नारायण हा जप आमुचा। सर्व हा मंत्राचा आत्माराम। १ ।
माधव गोविंद सर्वशास्त्रीं आहे। उभारूनियां बाहे वेदुसांगे। २ ।
नामाचेनि पाठें तरूं हा भवसागरू। आणिक विचारू नेणों आम्ही। ३ ।
विष्णु मधुसूदन हें दैवत आमुचें। नित्य पैं नामाचें सार आम्हां। ४ ।
त्रिविक्रम वामन सर्व ब्रह्मांड नायकु। हाचि जप सम्यकु आम्हा घटीं। ५ ।
श्रीधर हृषिकेश मंत्रराज जपा। पावाल स्वरूपा विष्णुचिया। ६ ।
पद्मनाभ दामोदर हा नामाचा विस्तार। करितां विचार तरले जीव। ७ ।
संकर्षण वासुदेव पंढरीचा राणा। सांगितल्या खुणा खेचरराये। ८ ।
प्रद्युम्न अनिरूद्ध दैवत कुळींचें। पुंडलीक तयाचें तप सार। ९ ।
पुरूषोत्तम अधोक्षज वैकुंठ निर्मळ। जपतां सकळ पापें जाती। १०।
नरसिंह अच्युत नामाचें कवच। जपतां होय वेच संसारासी। ११।
जनार्दन उपेन्द्र नाम हें अमृत। शंकर निवांत जपें सदा। १२।
हरी कृष्ण विष्णु सर्व घटीं नांदे। तोचि पैं आल्हादे उच्चारिजेसु। १३।
ऐसा नाम महिमा उपदेशु गोमटा। नामेंचि वैकुंठा भक्त गेले। १४।
नामा म्हणे ते मूर्ति पंढरीये गोमटी। नामें उठाउठी भेटी देती। १५।

संध्येतील संकलीत नामावली समाप्त

## संत नामदेवांची आर्त आळवणी

१०५. येई हो विठ्ठले भक्तजनवत्सले। करुणा कल्लोळे पांडुरंगे। १ ।
सजलजलदघन पीतांबर परिधान। येईं उद्धरणे केशिराजे। २ ।
नामा म्हणे तूं विश्वाची जननी। क्षिराब्धि निवासनी जगदंबे। ३ ।

१०६. येईं गे विठ्ठले अनाथाचे। माझे कुळदैवते पंढरीचे। १ ।
पंचही प्राणांचा उजळोनि दीप। सुंदर श्रीमुख ओंवाळीन। २ ।

मनाचा प्रसाद तुजलागीं केला। रंगभोग आपुला घेऊनि राहे। ३ ।
आनंदाचा भोग घालीन आसनीं। वैकुंठवासिनी तुझ्या नांवें। ४ ।
आपुलें म्हणवावें सनाथ करावें। भावें संचरावें हृदयघटीं। ५ ।
नामा म्हणे माझे पुरवीं मनोरथ। देईं सदोदित प्रेमकळा। ६ ।

१०७. येईं वो कृपावंते अनाथांचे नाथे। निवारीं भवव्यथे पांडुरंगे। १ ।
मी बाळक भुकाळु तूं माउली कृपाळू। करीं माझा सांभाळु पांडुरंगे। २ ।
तूं माझें पैं माहेर नित्य आठवे अंतर। सखा विटेवर पांडुरंगा। ३ ।
मी देह तूं चैतन्य मी क्षुधार्थि तूं अन्न। तृषार्थी तूं जीवन पांडुरंगा। ४ ।
मी चकोर तूं चंद्र मी सरिता तूं सागर। मी याचक तूं दातार पांडुरंगा। ५ ।
मी धनलोभी शुभ तूं पूर्ण कनककुंभ। मी मगर तूं अंभ पांडुरंगा। ६ ।
मी चातक तूं मेघ मी प्रवृत्ति तूं बोध। मी शुष्कनदी तूं ओघ पांडुरंगा। ७ ।
मी दोषी तूं तारक मी भृत्य तूं नायक। मी प्रजा तूं पाळक पांडुरंगा। ८ ।
मी पाडस तूं कुरंगिणी मी अंडज तूं पक्षिणी। मी अपत्य तूं जननी पांडुरंगा। ९ ।
मी भक्ति तूं निजसोय मी ध्यान तूं ध्येय। मी आडळ तूं साह्य पांडुरंगा। १०।
ऐसी जे जे माझी विनंती ते तुजचि लक्ष्मीपती। नित्य सुखी सांगाती पांडुरंगा। ११।
शीघ्र येईं वो श्रीरंगे भक्त मानस रंगे। प्रेमपान्हा देगे नामदेवा। १२।

१०८. येईं बा विठ्ठले मजलागीं झडकरी। बुडतों भवसागरीं काढीं मज। १ ।
आकांता अवसरीं स्मरलासे गजेंद्रें। दीनानाथ ब्रिदें साच केलीं। २ ।
द्रौपदी संकटीं स्मरलीसे वनवासीं। धांवोनि आलीसि लवडसवडी। ३ ।
प्रल्हादें तुजलागीं स्मरिलें निर्वाणीं। संकटापासोनि राखियेलें। ४ ।
नामा म्हणे थोर पीडिलों गर्भवासें। अखंड पाहतुसें वाट तुझी। ५ ।

१०९. येईंवो विठ्ठले माझे माऊली ये। निढळावरी कर ठेऊनि वाट पाहे। धृ०।
येतिया पुसे जातिया धाडी निरोप। पंढरपुरी आहे आमुचा मायबाप। १ ।
पितांबराची कांस शेला गगनी झळकला। गरूडावरी बैसोनि आमुचा कैवारी आला। २ ।
विठोबाचे राज्य आम्हां नित्य दिवाळी। विष्णुदास नामा जीवे भावे ओवाळी। ३ ।

## संत नामदेवांची पूर्वपीठीका

११०. यदूशेटी शिंपी वैराग्याचा मेरू । विठूचा डिंगरू नरसी गावी । १ ।
पंढरीची वारी नित्य नेम करी । त्याचा पुत्र हरी विठ्ठलभक्त । २ ।
हरीशेटीचा तो गोपाळ एकला । देवाचा भुकेला निशीदिनी । ३ ।
गोविंद राघव त्याचे दोन्ही सुत । पंढरीशी नेत गुढी आवडी । ४ ।
सदभावे वंदावे पद गोविंदाचे । हरिनाम वाचे त्याचे गोड । ५ ।
जिवाजी धाकुला नरहरी थोरू । सुकृत सागरू पोटी आला । ६ ।
नरहरीचा तो पुत्र दामुशेटी । प्रेमभक्ती मोठी भाग्यवंत । ७ ।
मस्तकी तयाची घ्यावी पायधुळी । प्रेमाचा कवळू त्याचे चित्त । ८ ।
आउबाई आली दामुशेटी पोटी । भक्तीभावे मिठी घालू तिला । ९ ।
बहू दिन झाले पोटी नाही पुत्र । चिंता दिनरात्र उभयाशी । १० ।
नवसिले देव सांडिली नरसी । आला पंढरीशी दामुशेटी । ११ ।
वंध्यत्व पातले पुत्राविण देवा । वैकुंठीच्या राऊळा हासो आले । १२ ।
आज्ञापिले देवे जावे तुवा उद्धवा । व्हावे नामदेव गोणाई पोटी । १३ ।
जनीचा आनंद ओसंडे बाहेर । भक्तीचे माहेर आला नामा । १४ ।

## संत नामदेवांचे आत्मचरित्र (महाराष्ट्रातील)

१११. कल्याणींचा शिंपी हरिभक्त गोमा । त्यांची कांता उमा नरहरि भजनीं । १ ।
सरिता सुकृताची त्या पोटीं उत्पन्न । झाली संबोधन गोणाबाई । २ ।
गोणाई दामासेठी झालें पाणिग्रहण । संसारीं असोन नरसी गांवीं । ३ ।
गोत्र संज्ञा ऐका पूर्वजांची सहज । गाधिज भारद्वाज दोनी कुळें । ४ ।
आऊबाई कन्या झाली गोणाईसी । पुढें देवा नवसी पुत्रासाठीं । ५ ।
नामा म्हणे होतें विठोबाचे मनीं । तेंचि नित्य जननी नवस करी । ६ ।

११२. गोणाईने नवस केला। देवा पुत्र देईं मला। १ ।
ऐसा पुत्र देंई भक्त । ज्याला आवडे पंढरीनाथ। २ ।
शुद्ध देखोनियां भाव। पोटा आले नामदेव। ३ ।
दामाशेटी हरुषला । दासी जनीनें ओवाळिला। ४ ।

११३. लोलो लागला अंबेचा। विठाबाई आनंदीचा। १ ।
आदि ठाणें पंढरपूर । नांदे कान्हाई सुंदर। २ ।
गोणाईनें नवस केला। देवा पुत्र देंई मला। ३ ।
शुद्ध देखोनियां भाव। पोटा आले नामदेव। ४ ।
दामाशेटी हरुषला । दासी जनीस आनंद झाला। ५ ।

११४. नामदेव पुत्र झाला। विठो बारशासी आला। १ ।
आंगडें टोपडें पेहरण। शेला मुंडासा घेऊन। २ ।
माझ्या जीवीच्या जीवना। नाम ठेवी नारायणा। ३ ।
जनी म्हणे पांडुरंगा। नांव काय ठेवूं सांगा। ४ ।

११५. माझें जन्मपत्र बाबाजी ब्राह्मणें । लिहिलें त्याची खूण सारू ऐका। १ ।
अधिक ब्याण्णव गणित अकराशतें । उगवतां आदित्य रोहिणीसीं। २ ।
शुक्ल एकादशी कार्तिकी रविवार । प्रमोद संवत्सर शालिवाहन शके। ३ ।
प्रसवली माता मज मळमूत्रीं । तेव्हां जिव्हेवरी लिहीलें देवें। ४ ।
शत कोटी अभंग करील प्रतिज्ञा । नाम मंत्र खुणा वाचुनी पाहे। ५ ।
ऐंशीं वर्षे आयुष्य पत्रिका प्रमाण। नामसंकीर्तने नामया वृद्धि। ६ ।

११६. शिंपियाचे कुळीं जन्म माझा झाला। परि हेतु गुंतला सदाशिवीं। १ ।
रात्रिमाजि शिवीं दिवसामाजि शिवीं । आराणुक जीवीं नाहीं माझ्या। २ ।
सुई आणि सातुळी कात्री गज दोरा । मांडिला पसारा सदाशिवीं। ३ ।
नामा म्हणे शिवीं विठोबाची अंगीं । त्याचेनि मी जगीं धन्य झालो। ४ ।

११७. नामा शिंपे नामा शिंपे। रोप लाविलें केशव बापें। १ ।
एक उगवली आरडी दरडी। एक वाळुनि झाली कोरडी। २ ।
एक पुण्य फळासि आली। एक कळींच निर्फळ झाली। ३ ।
नामा उगवला केशव द्वारीं। न माये आंत बाहेरी। ४ ।

११८. परिसासीं लोह लागती ते कनकचि होती। तया मागील ते गति बोलों नये। १ ।
आड ओहोळ वाहती ते गंगेसि मिळती। तया मागिल ते गति बोलों नये। २ ।
काक विष्ठा करिती तेथें पिंपळ होती। तया मागिल ते गति बोलों नये। ३ ।
परद्वारीं होती पतिसरसे होय सती। तया मागिल ते गति बोलों नये। ४ ।
नामा मध्यम जाति परिस प्रेमळ भक्ति। तया मागिल ते गति बोलों नये। ५ ।

११९. लोखंडाचा विळा परिसासी लागला। मागिलिया मोला मागूं नये। १ ।
दासी होती परि रायासी रतली। मागिल ते बोली बोलों नये। २ ।
वेश्या होती तेचि पतिव्रता झाली। मागील ते बोली बोलों नये। ३ ।
विष्णुदास नामा विठ्ठलीं रंगला। तो शिंपी वहिला म्हणों नये। ४ ।

१२०. कुश्चळ भूमीवरी उगवली तुळसी। अपवित्र तियेसी म्हणों नये। १ ।
काकविष्ठेमाजि जन्मे तो पिंपळ। तया अमंगळ म्हणों नये। २ ।
दासीचिया पुत्रा राज्यपद आलें। उपमा मागील देऊं नये। ३ ।
नामा म्हणे तैसा जातीचा मी शिंपी। उपमा जातीची देऊं नये। ४ ।

१२१. नैवेद्येचा नेम असे दामाजीसी। नित्य विठ्ठलासी न्यावे बोणें। १ ।
बोणें दाखवावे मग अन्न घ्यावे। ऐसा तो सद्भाव त्याचे मनीं। २ ।
ऐसें करितां दिन कांही क्रमिले। दामाजी चालिले ग्रामांतरा। ३ ।
दामाशेटी काय म्हणे गोणाईसी। नित्य विठोबासी न्यावे बोणें। ४ ।
गोणाई बोलिली सांगा नामदेवा। करील तो सेवा विठ्ठलाची। ५ ।
दामाजीनें पुत्र बोलाविला नामा। करीं मेघ:श्यामा सेवा नित्य। ६ ।

संत नामदेवाचा जन्म पुण्यक्षेत्र पंढरीत झाला.

नित्यानित्य न्यावे विठोबासी बोणें । मग अन्न घेणें आज्ञा केली। ७ ।
अवश्य म्हणोनि लागला चरणासी । धरिलें पोटासी नामदेवा । ८ ।
नामदेवा हाती समर्पिले बोणें। गेला तो तेथुनी गोंदा म्हणे । ९ ।

१२२. नामदेवा कैसा हा रे नफा केला । नैवेद्य तो नेला विठ्ठलासी। १ ।
नैवेद्य नेऊनि ठेवियेला पुढें। प्रेमे बोले गोड नामदेव। २ ।
नामदेव म्हणे जेवावें विठ्ठला। माथा ठेवियेला चरणांवरी । ३ ।
नामदेव माथा ठेवी चरणांवरी । न जेवीच परी पांडुरंग। ४ ।
न जेवी म्हणोनी नामा शोक करी । मुख पाहे हरि प्रीति करोनी। ५ ।
प्रेमें नामा काय म्हणे विठ्ठलासी। कां रे न जेविसी मायबापा । ६ ।
माझे पितयाचे हातें तू जेविसी । मज दुजें पाहसी पांडुरंगा। ७ ।
घरासी मी आतां बोणें नेऊं काई। मारील गोणाई मज आतां । ८ ।
काय करूं आतां देवा हो श्रीहरी। नामा विनंति करी गोंदा म्हणे। ९ ।

१२३. विनवितो देवा बहुत प्रकारीं। जेवावें श्रीहरी मायबापा। १ ।
दोनी कर जोडोनि घाली लोटांगण । द्यावे जीवदान देवराया। २ ।
अझुनी नये तुज बा करूणा। काय नारायणा करूं आतां। ३ ।
मारील गोणाई घेईल माझा जीव। काय तरी कींव नये माझी। ४ ।
काय करूं आतां विठ्ठल रूक्माई । मारील गोणाई मजलागीं। ५ ।
नये तुज कांहीं कींव माझी पाहीं। वाहीन आतां पायीं शिरकमळ। ६ ।
वाहीन शिरकमळ म्हणे नामदेव। धरिला सद्भाव ऐसा मनीं। ७ ।
देह त्याग त्यांने मांडिला शरिरी। फांसा करूनि दोरी लावियेली। ८ ।
गळां घालूनि फांस बांधिला काष्ठासी। त्यागितां प्राणासी धरिलें देवें। ९ ।
उठविला नामा पांडुरंगें करीं। आलिंगी श्रीहरी गोंदा म्हणे। १०।

नैवेद्य अर्पण करताना तसेच भोजनापूर्वी पुढील अभंग हात जोडून म्हणावा.

१२४. केशवा माधवा गोविंदा गोपाळा । जेवीं तूं कृपाळा पांडुरंगा । १ ।
अच्युता वामना दशरथनंदना । जेवीं तूं बा कृष्णा पांडुरंगा । २ ।
कृष्णा विष्णु हरी मधुसूदन मुरारी । जेवीं तूं नरहरी पांडुरंगा । ३ ।
ऐसी ग्लानि करितां विठ्ठल पावला । नैवेद्य जेविला नामयाचा । ४ ।

१२५. जेऊनियां हातीं देवें दिधली वाटी । आला उठाउठी नामा घरा । १ ।
गोणाई म्हणे रे ऐकें नामदेवा । नैवेद्य आणावा माझे हातीं । २ ।
तेव्हां नामदेवें हातीं दिधली वाटी । पाहूं गेली दृष्टीं रिकामी ते । ३ ।
काय तुज घरीं उणें होतें अन्न । नैवेद्य आपण तेथें खावा । ४ ।
ते दोघे बोलतां दामाशेटी आला । पुसे त्या दोघांला काय गुह्य । ५ ।
देखियेलें नाहीं नाहीं ऐकियेलें । ऐसें सांगीतलें नामदेवें । ६ ।
दामाशेटी म्हणे आतां असों द्यावें । सकाळीं पहावें प्रचित हें । ७ ।

१२६. आम्ही हांटा जाऊं लवकरी येऊं । नैवेद्य पाठवूं नाम्याहातीं । १ ।
दुसऱ्या दिवशीं नैवेद्य धाडिला । दामाशेटी गेला त्याच्या मागें । २ ।
जाऊनियां नामा उभा राहे सन्मुख । म्हणे विठोबास जेवीं बापा । ३ ।
देव म्हणे नाम्या बसावें द्वारात । लवकरी जेवितों पाहें आतां । ४ ।
जेऊनियां देवें हातीं दिधली वाटी । तेव्हां दामशेटी काय बोले । ५ ।
बारावर्षे तुज उपवासी मारिलें । आजि जेवविलें नामदेवें । ६ ।
देव म्हणे आतां ऐका दामशेटी । हे तों गुह्य गोष्टी बोलूं नका । ७ ।
आम्ही न बोलतां आम्ही न सांगतां । कळे अवचिता आपणासी । ८ ।
करसी चोरी तूं गुप्त गोकुळांत । पृथ्वींत मात कोणीं नेली । ९ ।
गोकुळींच्या गोष्टी येथें बोलूं नये । मौन पंढरीये धरिलें आहे । १० ।
मौन धरियेलें सांगसी आम्हांसी । तरी कां जेवशी पांडुरंगा । ११ ।
काय तुझें घर पडियेलें ओस । चोरख्यासंगें कैसा जेवलासी । १२ ।

चोखियाचें अन्न मिष्टान्न भोजन। मिळायाकारण तेथें नाहीं। १३।
राम अवतारीं वान्नरगणें। लंकेसी झोंबणें सीतेसाठीं। १४।
पाला खाऊनियां वाहिले पर्वत। बांधियेला सेतु सिंधुवरी। १५।
कृष्ण अवतारीं गोपाळ साचार। वळूं गायी फार देवा सवें। १६।
यमुनेचे तीरीं खेळूं चेंडुफळी। आपण दिधली नाहीं डायी। १७।
पसरितों पदर धरितों हनुवटी। अन्याय हा पोटीं घालीं नाम्या। १८।
तेव्हां दामशेटी धरूनी हातासी। म्हणे नामयासी चाल घरा। १९।
धन्य माझें भाग्य धन्य माझा वंश। परब्रह्म वेष प्रगटलें। २०।
बौद्ध अवतारीं आम्ही झालों संत। वर्णावया मात नामा म्हणे। २१।

१२७. केशवाचें प्रेम नामयाचि जाणे। नामया हृदयीं असणें केशवातें। १।
नामा तो केशव केशव तो नामा। अभिन्नत्व आम्हां केशवासी। २।
नामा म्हणे केशवा दुजेपणा नाही। परि प्रेम तुझ्या ठायीं ठेवियेले। ३।

१२८. आम्हां कीर्तन कुळवाडी। आणिक नाहीं उदीम जोडी। १।
वाचा पिकली पिकली। हरिनामाची वरो झाली। २।
एकादशीचे दिवशीं। झाल्या कैवल्याच्या राशी। ३।
संत म्हणती नामा आला। हरि नामाचा सुकाळ झाला। ४।

## संत नामदेवांचा कवित्वाविषयी निश्चय

१२९. चंद्रभागे तीरीं आयकिली गोष्टी। वाल्मिकें शतकोटी ग्रंथ केला। १।
माझिया चित्तासी फार झाले क्लेश। व्यर्थ म्यां आयुष्य गमाविलें। २।
जाऊनि राऊळा विठोसी विनवीलें। वाल्मिकानें केलें रामायण। ३।
असेन मी खरा तुझा भक्त देवा। सिद्धीस हा न्यावा पण माझा। ४।
शतकोटी तुझे करीन अभंग। म्हणे पांडुरंग ऐक नामया। ५।
तयेवेळीं होती आयुष्याची वृद्धि। आतांची अवधि थोडी असे। ६।
नामा म्हणे जरी न होतां संपूर्ण। जिव्हा उतरीन तुज पुढें। ७।

१३०. निश्चय पाहूनि उपजली दया। स्वामी देवराया पांडुरंगा। १ ।
सारजेसी सांगे भीमातीरीं हरि। बैस जिव्हेवरी नामयाच्या। २ ।
लाडिकें लडिवाळ नामा माझें तान्हें । तयाला मजवीण कोण आहे। ३ ।
मजवरी त्याचें फार असे ऋण। होईन उत्तीर्ण एवढ्यानें। ४ ।
नामा म्हणे हातीं बांधोनियां वह्या । बैसे लिहावया पांडुरंग। ५ ।

१३१. गरूडपाराजवळी नामदेव आला । सन्मुख देखिला पांडुरंग । १ ।
मेघ:शाममूर्ती डोळस सांवळी । तें ध्यान हृदयकमळीं धरोनि ठेला। २ ।
धन्य नामदेव भक्तशिरोमणी । ज्याचा चक्रपाणि वेळाइतु। ३ ।
पूर्ण सहज स्थितीसुखाचा झालासे अनुभव। सकळ देहभाव पारुषले । ४ ।
मन पांगुळलें स्वरूपीं गुंतलें। बोलणें खुंटलें प्रीतिमौन। ५ ।
सबाह्य अभ्यंतरीं स्वरूप कोंदलें । द्वैत निरसलें दृश्याकारें। ६ ।
निजरूप निर्धारितां नयन सोज्वळ झाले। रोमांच दाटले खरबरीत। ७ ।
अनंदघन वोळलासे अंबरीं । वर्षाव सहस्रधारीं होतो तेथें। ८ ।
तें क्षीर सेवितां झालें समाधान। चुकलें जन्ममरण कल्पकोटी। ९ ।
सहज सुखें निवाला भवदु:ख विसरला । विसावा भेटला पांडुरंग।१०।
नामा म्हणे दृष्टी लागेल पा झणीं । धन्य पुंडलीकाचेनि जोडलें सुख।११।

१३२. हातीं विणा मुखी हरी। गायें राउळाभितरीं। १ ।
अन्न उदक सोडिलें। ध्यान देवाचें लागलें। २ ।
स्त्री पुत्र बाप माय । यांचा आठव न होय। ३ ।
देहभाव हारपला। छंद हरीचा लागला। ४ ।
नामा म्हणे हेंचि देईं । तुझे पाय माझे डोयी। ५ ।

१३३. टाळ दिंडी हातीं उभा महाद्वारीं। नामा कीर्तन करीं पंढरीये। १ ।
आवडीचेनि सुखें वोसंडतु प्रेमें। गातों मनोधर्में हरिचे गुण। २ ।
सांडोनि अभिमान नाचें धरोनि कान। अंतरीं तें ध्यान विठोबाचें। ३ ।

श्रीहरिची उत्तम जन्मकर्मनामें। घेतलीं त्या प्रेमें सुखरूपें। ४ ।
संताची विश्रांति ज्ञानियांचें गुज । जें कां मुक्तिबीज मोक्षदानी । ५ ।
कृष्णा विष्णु हरी मुकुंदा मुरारी। अच्युता नरहरी नारायणा। ६ ।
गोवर्धनधर गोपीमनोहर। भक्तकरुणाकर पांडुरंगा। ७ ।
सकळ मंगळनिधी पातकभंजना। हरीजगज्जीवना परमानंदा। ८ ।
तूंचि एक सकळ आदिमध्यअंतीं। नित्य सुखसंपत्ति सज्जनांची। ९ ।
तूंचि माझा श्रोता तूंचि माझा वक्ता। तूंचि घेता देता प्रेमसुख। १०।
नामदेव ऐसे नाम त्वा ठेविले। येणे अनुभविले प्रेमसुख। ११।
विष्णुदास नामा विनवी पुरुषोत्तमा। सोडवीं भवश्रमा पासूनियां। १२।

१३४. तुझे नित्य सुख घ्यावें येणें मनें। असावें संधानें चरणाचेनि। १ ।
वासने विरहित होऊनि एकवट। असावें निकट संतसंगें। २ ।
ऐशी मज कृपा करीं गा विठ्ठला। म्हणविसी आपुला दास जरी। ३ ।
श्रवणीं तुझे नाम ऐकावें आवडी। चित्तें देऊनि बुडी प्रेमडोहीं। ४ ।
नयनीं तुझें रूप देखावें सर्वत्र। व्हावे भूतमात्र सखे माझे। ५ ।
वदनीं तुझें नाम गावें निर्विकल्प। धरोनि तुझें रूप हृदयकमळीं। ६ ।
काया संतचरणी जावी लोटांगणीं। तें भाग्य अनुदिनीं देई बापा। ७ ।
हेंचि माझें व्रत हेंचि तपतीर्थ। करावें दास्यत्व संतांचें हें। ८ ।
अनुदिनीं व्हावा संतांचा हा संग। असावा अनुराग कीर्तनाचा। ९ ।
मानाचा मज ओस अपमानीं उल्हास। देईं तुझा ध्यास सर्वकाळ। १०।
नामा म्हणे विठोबा तरीच शरणागत। नाहीं तरी पतित म्हणती मज। ११।

१३५. माझे मनीं ऐसें होतसे गा देवा। देह समर्पावा तुझे पायीं। १ ।
तंव या मायामोहें मजसी केला हेवा। लोटियेलें देवा भवजळामाजी। २ ।
आशा नदी पुरीं वाहविलें दूरीं। काढीं मज हरी कृपाळुवा। ३ ।
सरिता माजी धरिलों मदन मगरीं। पुढारीं माघारीं होऊं नेदी। ४ ।

न निर्घे न निर्घे न निर्घे आणिका पोहणारें। सहित पीतांबरें घालीं उडी। ५ ।
थडीये उभया धांवगा श्रीहरी। हानि झाली थोरी सर्व गेले। ६ ।
भक्ती नवरत्नाची बुडाली वाखोरी। काढीं वेगीं हरी कृपाळुवा। ७ ।
धीर आणि विचार ह्या दोन्ही सांगडीं। श्रद्धा पुढें दोरी तुटोनी गेली। ८ ।
भावबळें सांपडलों दाटलों उभडी। वेगी घालीं उडी कृपाळुवा। ९ ।
नामा म्हणे भजनेंविण कोरडा गळा। नेतो रसातळा क्रोध मीन। १०।

१३६. दृष्टि उघडुनि नामा भोंवती जंव पाहे। तंव पुढें माय देखियली। १ ।
म्हणे मजशीं नाम्या वैर का साधिलें। बहुत दुःख झालें कोणा सांगों। २ ।
भक्तजनवत्सला परियेसी केशवा। भेटसी केधवां पूर्वस्थिती। ३ ।
भोजना बैसले जेविं क्षुधाक्रांत। ते कोणाशीं मात न बोलें कांहीं। ४ ।
तें बळें उठविलें नव्हतां पैं तृप्ति। तैसी दुःखप्राप्ति झाली मज। ५ ।
पूर्ण पान्हा धेनु घातला वोरसें। वत्स थोर हर्षें पान करी। ६ ।
तें धनियें देखोनि बळें आसुंडलें। तळमळित ठेलें थोर आशा। ७ ।
कृपणें संपत्ति जोडिली सायासें। तळमळीतें कैसें नेलियातें। ८ ।
तैसी परी मज जाहली गा देवा। परियेसीं केशवा मायबापा। ९ ।
दुःखाचे सागरीं पडिलों गा श्रीहरी। सुखरूप मुरारी निववी मातें। १०।
नामा म्हणे विठो कृपेचा सागरू। करावा अंगिकारू अनाथाचा। ११।

१३७. माता वाट पाहे नामा अझुनि कां नये। देखोन विठ्ठल काय भुलला तेथें। १ ।
ऐसें मज पाहतां हेंचि घडे साचें। विठ्ठलीं मन त्याचें गुंतलें असे। २ ।
काय सांगों माय जातो देवळासीं। जपतो अहर्निशीं विठ्ठल नाम। ३ ।
तहान भूक कांहीं आथीच ना मनीं। विठ्ठल विठ्ठल म्हणोनि हाचि छंद। ४ ।
नेणो कवण्या गुणें भुलविलें यातें। विंदान आमुतें न कळे कांहीं। ५ ।
दिशा अवलोकितां प्राण नव्हे निश्चित। बहुत चिंताक्रांत झाली असे। ६ ।
तेथुन लवलाहें धांवत निघाली। महाद्वारा आली पहावया। ७ ।

तो तव पांडुरंगा सन्मुख देखिला। चित्रींचा लिहिला पुतळा जैसा। ८ ।
नाहीं चळणवळण तटस्थ नयन। केलें निंबलोण योगिजनीं। ९ ।
तें देखोनि मातेसी थोर द्वेष आला। क्रोधें आसुडिला करीं धरूनी। १०।
तंव प्रेताचियेपरी पडिला भूमीवरी। देखोनि सुंदरी रूदना करी। ११।
मग उचलोनि ओसंगा धरिला पोटासीं। म्हणे कारे रुसलासी सांग नाम्या। १२।
निढळासि निढळ मिळवुनि ते रडे। माझिये कान्हाडे काय झालें। १३।
दृष्टि उघडूनि नामा भोंवतें जंव पाहे। तंव सन्मुख माय देखियेली। १४।
येरी उचलूनि दिधलें आलिंगन। झालें समाधान तयेवेळीं। १५।
सुहृदें सोयरीं सकळिकें मिळोनिं। करिती झाडणी नानापरी। १६।
माउली नव्हेसि तूं वैरिणी जाण। माझ्या केशवाची खूण अंतरली। १७।
शस्त्रेंविण वध केला अवचिता। जीव तळमळतां जाऊं पाहे। १८।
आतां परतोनि माझी वाट पाहसी। साच रिपु होसी तरी जाण। १९।
नामा म्हणे माते जाईं हो येथूनि। मज जाईं निरवूनि विठोबासी। २०।

१३८. नवमास वरी म्यां वाहिलासि उदरीं। आस केली थोरी होसी म्हणोनी। १ ।
शेखीं त्वां रे नाम्या ऐसें काय केलें। वनीं मोकलीलें निरंजनीं। २ ।
कां रे नामदेवा झालासी निष्ठुर। न बोलसी उत्तर मजसिं कांहीं। ३ ।
सज्जन सोयरीं सांडियली लाज। झालासि निर्लज्ज एकसरा। ४ ।
प्रेम पिसें तुज लाविलें विठ्ठलें। रूप दावूनि केलें तद्रूप तुज। ५ ।
यासिं सेविलीया कैची बाप माय। सर्व हाचि होय सर्वां ठायीं। ६ ।
ऐसियाचा संग धरियला तुवा। परिणामीं अनुभवा जाणशील। ७ ।
संत सनकादिकां लावियेलें वेधीं। तिंही संसार उपाधि सांडियेली। ८ ।
विठ्ठल विठ्ठल हेंचि पैं चिंतन। विटेसहित चरण धरियेले। ९ ।
ऐसें शिकवितां नामयाचें न मोहरे चित्त। पाहतसे तटस्थ तन्मय दृष्टीं। १०।
नामा म्हणे माते वांयां कां कष्टसी। विठोबा जीवेंसि जडला जाण। ११।

१३९. माता म्हणे नामा राउळाशीं खेळतां । तुज कोण्या दैवता ओढियलें । १ ।
लाजिरवाणें नाम्या तुवा केलें जिणें । हांसती पिशुनें देशोदेशीं । २ ।
सांडीं देवपिसें नको करूं ऐसें । बळें घर कैसें बुडविसी । ३ ।
जन्मा येऊनियां पराक्रम करीं । कां होसी संसारीं भूमिभार । ४ ।
सुदैवाचीं लेंकरें वर्तताति कैसीं । तूं मज झालासि कुळक्षय । ५ ।
कैसी तुज नाहीं लौकिकाची लाज । हेंचि थोर मज नवल वाटे । ६ ।
अभिमान अहंता सांडुनियां जगीं । नाचतोसि रंगीं गीत गातां । ७ ।
तुजविण लोक अज्ञान नसती । क्षण न विसंबती मायबापा । ८ ।
पुत्र आणि कलत्र घराची विपत्ति । तुज अभाग्याचे चित्तीं पंढरीनाथ । ९ ।
यातें भजती त्याचें न उरेचि कांहीं । हाचि देव पाहीं घरघेणा । १० ।
जयाचें खुंटे तो लागे याच्या पंथें । तुजसि शिकवितें म्हणोनियां । ११ ।
गोणाई म्हणे नाम्या हें नव्हे पैं भलें । विठोबाने केलें आपणा ऐसें । १२ ।

१४०. अरे नामदेवा नव्हेसि लेंकरूं । जरी जाणसी विचारू संसारिक । १ ।
शिवण्याटिपण्यासी त्वां घातलें पाणी । न पाहसी परतोनि घराकडे । २ ।
कैसी तुझी भक्ति या देशावेगळी । संसाराची धुळी केली नाम्या । ३ ।
उदंड पैं आम्हीं देखियेले भक्त । परि तूं आपुलें हित न विचारिसी । ४ ।
अन्नेंसि उपवासी बैसलासि येथें । काय देईल तूतें विठ्ठल हा । ५ ।
थिता पुंडलिकें भाकेसी गोंविला । त्यासी प्रयत्न बळ न चले कांहीं । ६ ।
गोकुळीं करूनि चोरी आपुलें पोट भरी । तो तुज निर्धारीं देईल काय । ७ ।
तूं निलाजिरा पाहीं तुज लाज नाहीं । वेळोवेळां कायी सांगों तुज । ८ ।
सांडूनि घरदार आपुला संसार । नाचतां विचार न करिसी मनीं । ९ ।
काम कष्ट तुवां सांडियले आतां । संसाराची चिंता कोण करी । १० ।
गोणाई म्हणे नाम्या नव्हे रे हें भलें । विठ्ठलनामें केलें आपणा ऐसें । ११ ।

१४१. गोणाई म्हणे नाम्या वचन माझें ऐक । पोटीचें बाळक म्हणोनि सांगे। १ ।
महिमेचा संसार सांडोनि आपुला। संग त्वा धरिला नि:संगाचा। २ ।
या काय मागसी तो काय देईल। शीघ्रची नेईल वैकुंठासी। ३ ।
सविल्याचीं लेंकुरें वर्ततातो कैसीं। तूं मज झालासी कुळक्षय। ४ ।
धनधान्य पुत्र कलत्रें नांदती । तुज अभाग्याचे चित्तीं पांडुरंग। ५ ।
शिवण्या टिपण्या घातलेंसे पाणी । न पाहासी परतोनी घराकडे। ६ ।
कैसी तुझी भक्ती या लौकिका वेगळी। संसाराची होळी केली नाम्या। ७ ।
याची तुवां कैसी धरियेली कांस। हा तंव कवणास झाला नाहीं। ८ ।
त्यातें जे अनुसरती त्याचें नुरे कांहीं। देव नव्हे पाहीं हा घर घेणा। ९ ।
लक्षुमी सारिखी सुंदर टाकोनी। ताटिका गौळणी गौळीयांच्या। १० ।
अष्टसिद्धी दासी जयाच्या कामारी। कल्पवृक्ष द्वारीं कामधेनु। ११ ।
टाकोनि बळीचे द्वारीं भीक मागों गेला। धरोनी बांधला दारवंटा। १२ ।
कुबज्या कुरूप कंसाचिया दासी। जीवें भावें तिसीं रतलासे। १३ ।
यातें भजती त्याच्या संसाराची नासी। जडला जीवेसी नवजाय। १४ ।
ठकोनियां येणे बहु नाडियेलें। तैसें तुज झालें सत्य जाण। १५ ।
गोणाई म्हणे नाम्या नाइकसी शिकविलें। घर त्वां बुडविलें कुळासहित। १६ ।

१४२. कापड घेउनी जाय बाजारासी। गोणाई नाम्यासी शिकवितसे। १ ।
लोकांचे हे पुत्र संसार करिती। आमुची फजिती केली नाम्या। २ ।
नाम्या विठोबाचा संग नव्हे बरा। मैंद हा खरा गळाकाटू। ३ ।
याचे संगतीनें संसार जाळावा। भोपळा हा घ्यावा भीक मागूं। ४ ।
नको संग धरूं नाम्या ऐक गोष्टी। गोणाई हनुवटी धरूनी सांगे। ५ ।

१४३. नामा म्हणे माते ऐक वो वचना। मी गेलों दर्शना राऊळासी। १ ।
अंतरी देउळीं जाहला संचार। पारुषला धीर या देहाचा। २ ।

तैंहुनि तुज मज तुटला संबंधु । विठ्ठलाचा छंदु घेतला जीवीं । ३ ।
लौकिक व्यवहार नाठवेचि कांहीं । कल्पना ते देहीं आथीचना । ४ ।
टाळ दिंडी घेऊनि नाचतों रंगणीं । तेणें माझ्या मनीं सुख वाटे । ५ ।
या देहघरसंसाराचा आलासें कंटाळा । म्हणोनि गोपाळा शरण आलों । ६ ।
पुत्र कलत्र येथें कायसीं बापुडीं । जेणें रौरव कुंडी वास घडे । ७ ।
तूं जरी म्हणसी हें सत्य संसारसुख । तरी हें केवळ विख विस्तारलें । ८ ।
तेंचि हें जाण म्हणोनि टाकियलें दुरी । तें सेवितां उरी कैंची माते । ९ ।
म्हणोनि मी झालों या संतांचा दीन । तेणें हरिला सीण जन्मांतरींचा । १० ।
नामा म्हणे आतां मीतूपण कैचें । मी या विठोबाचें शरणागत । ११ ।

१४४. जनिता जीवविता सर्वज्ञ प्रतिपाळिता । आडणी सांभाळिता चराचरीं । १ ।
एक पांडुरंग दुजा नाहीं चांग । म्हणुनि याचा संग धरिला माते । २ ।
माझी तुज कांहीं करणें नलगें चिंता । मज आहे पोसिता पांडुरंग । ३ ।
हा शरणागतांचा जाणे कळवळा । हा पैं कळिकाळा पाहों नेदी । ४ ।
केले कोटिवरी न मानी अपराध । हें पैं साजे ब्रीद पांडुरंगा । ५ ।
आम्ही आपुल्या सुखें असों भलत्या ठायीं । प्रीति तया पायीं जडली असे । ६ ।
तेणें उपकारें न विसंबे क्षण । हातीं सुदर्शन घेऊनि उभा । ७ ।
जाणतां नेणतां रामा गावों गीतीं । जन्माची विश्रांति होय जेणें । ८ ।
ऐसी जीवलग होईल कैचें आन । संचला परिपूर्ण सर्वांठायी । ९ ।
इष्टमित्र बंधु सज्जन सोयरा । माझिया संसारा हाचि एक । १० ।
नामा म्हणे माते मज नचले मोहोपिसें । तुम्हांसि मज ऐसें होईल कई । ११ ।

१४५. साधावया अत्मसुख । तें हें विटेवरी देख । १ ।
नको जाऊं परदेशीं । वास करीं पंढरीसी । २ ।
भाव धरूनि बळकट । मुखीं नाम एकनिष्ठ । ३ ।
नामा म्हणे गोणाबाई । सर्व सुख याचे पायीं । ४ ।

१४६. गोणाई म्हणे नाम्या राहिलासी उदरीं। तैंहुनी मी करीं आस तुझी। १ ।
उपजलासी तैं मज झाला संतोष। आनंद उल्हास वाटे जीवा। २ ।
गण गोता माजी केलें बारे नांव। पंढरीचा देव प्रसन्न केला। ३ ।
रात्रंदिवस लेखी अंगोळी वरी । तूं मज संसारीं होसी म्हणोनि। ४ ।
तंव तुज अवचितीं उपजली बुद्धी। भोपळा हा खांदीं आवडला। ५ ।
हातीं टाळ घेऊनी करीसी आळवणी। घागरीया चरणीं बांधोनियां। ६ ।
सांडोनी घरदार आपुला संसार। नाचतां विचार न धरिसी। ७ ।
नव्हे तें करितां कोण असे वारिता। परी त्वां आपुल्या हिता प्रवर्तावें। ८ ।
मी एक आहें तंव करीन तळमळ। मग तुझा सांभाळ करील कोण। ९ ।
या विठ्ठलावांचूनी तुज नाहीं रे संसार। हा बोल निर्धार सत्य माझा। १० ।
कोण्या गुणें तुंवा घेतलें धरणें। गोणाई म्हणे करणें फळासी आलें। ११ ।

१४७. आपणा वेगळा कशाला निवडीसी। कां मज दवडिसी सांग नाम्या। १ ।
बरवें पुत्रपण झालासी उत्तीर्ण। आतां अभिमान पाहें माझा। २ ।
तुज नेल्यावांचून नव जाय येथून। पंढरी गिळीन विठोबासहित। ३ ।
जरी झालासी शाहाणा तरी माझें लेंकरूं। माझा आहे वेव्हारू या विठ्ठलासी। ४ ।
हा दानवांतें छळी आपणा म्हणवी बळी। तें मज जवळी नचले कांहीं। ५ ।
विटेसहित चरणीं बांधीन आपुला गळा। क्षण जीवा वेगळा जाऊं नेदी। ६ ।
आसनीं शयनीं न विसंबे भोजनीं। घालीन मुरडोनि हृदयामाजी। ७ ।
या देहाचा संकल्प आलेंसें करोन। घातलेंसे पाणी घरदारां। ८ ।
हा त्रिभुवनीं समर्थ मी असें जाणत। पाहेन पुरूषार्थ आजी याचा। ९ ।
अठ्ठावीस युगें भरलीं तया बोला। धरोनि उभा केला पुंडलीकें। १० ।
गोणाई म्हणे देवा होईं कां शहाणा। वांयां कां परधना धरिसी लोभु। ११ ।

१४८. नामा म्हणे माते परीयेसीं वचन। गुज मी सांगेन अंतरींचें। १ ।
धरोनि माझी वृत्ती पाहें माझें सुख। मी सांगतों तें ऐक जननिये। २ ।

कायावाचामनें ममत्व माझ्या ठायीं। तें तूं ठेवीं पाईं विठोबाचे। ३ ।
मग हा कृपासिंधु न विसंबेल तुज। अनाथाची लाज हाची राखे। ४ ।
पाहेंपां पशु जळचरें गांजिलें। सकळीं सांडिलें जिवलगीं। ५ ।
पीतांबरासहित घालोनियां उडी। सोडविला पानेडी अनाथ म्हणोनि। ६ ।
प्रऱ्हादाकारणें झाला पैं पिसाट। धरिले विकट रूप देवें। ७ ।
विदारूनी दैत्य आवेशें बहुत। यानें माझा भक्त गांजियेला। ८ ।
पांडवांचें काज करितां नाहीं लाज। म्हणे शरण मज अनन्यभावें। ९ ।
पाडसा कारणें जैसी कुरंगिणी। तैसा रानींवनीं सांभाळित। १० ।
जन्मोनियां माझे बहु लळे केले। आडचणीं सांभाळिलें अनाथनाथें। ११ ।
नामा म्हणे याचे दृढ धरिले चरण। कळीकाळापासोन सोडविलें। १२ ।

१४९. लाभाचिया लोभें मज म्हणसी आपुलें। परी नेणसी तापलें चित्त माझें। १ ।
जन्म मरण दुःखें शिणलों यातायातीं। ऐसी माझी खंती न विचारिसी। २ ।
म्हणोनि विठोबाचा झालों शरणागत। तेणें माझें हित ऐसें केलें। ३ ।
पुत्र कलत्र सकळ भजती हितालागीं। दुःखाचे विभागी नव्हती कोणी। ४ ।
जन्मोनि भजतां उचित एक चुके। तें होय पारिखें क्षणामाजी। ५ ।
नाना योनी हिंडतां आपुलें नीज कर्म। मज होय श्रम तें तूं देईं। ६ ।
परी माझ्या विठोबाची सेवा सुख गोडी। नाहीं एक घडी न देखों कोठें। ७ ।
जाती कुळ माझें नाहीं विचारिलें। नेणों अंगिकारिलें कवण्या गुणें। ८ ।
तुजवीण त्याचें हृदय कोंवळे। पाळी माझे लळे नानापरी। ९ ।
शिणलिया बोभाय मग मी वाट पाहें। ये वो माझे माये पांडुरंगे। १० ।
शब्द माझा कानीं पडतां तत्क्षणीं। येतसे टाकोनी झेंपावत। ११ ।
न सांगतां कांहीं सर्व जाणें जिवींचें। आणीक ऐसें कैचें लोभापर। १२ ।
देउनी अभयदान करें कुरवाळी। करितसे साउली पीतांबरें। १३ ।
मायबाप सखा जिवलग सोइरा। माझिया संसारा हाचि एक। १४ ।
नामा म्हणे माझ्या हृदयींचा विसावा। गीतीं गातां जीवा गोड वाटे। १५ ।

१५०. गोणाई म्हणे नाम्या जल्पसी भलतें। तुज कोण्या दैवतें वोढियेलें। १ ।
लाजिरवाणें तुवां केलें रे हें जिणें। हांसती पिसुनें देशोदेशीं। २ ।
सांडीं सांडीं नाम्या तूं हें देवपिसें। बळें घर कैसें बुडवितोसी। ३ ।
नवमास उदराभीतरीं वाहिला। माझ्या नेणत्या बाळा चाळविलें। ४ ।
तुझे द्वारीं बैसोनी उपवास करिन। नामा घेऊन जाईन गुणराशी। ५ ।
येथें तें होईल लटिकेंची भांडण। नामा द्यावा म्हणे गोणाई माझा। ६ ।
गोणाइ म्हणे नाम्या कळेल तें करीं। स्वहित विचारीं सांगों किती। ७ ।

१५१. वडील वडील आमुचे बोलतील गोष्टी। तुज ऐसा सृष्टी देवो नाहीं। १ ।
दर्शना आलिया पाडिसी आव्हांटा। मन मारुनी चोहाटा भुलविसी तूं। २ ।
ऐसा कैसा कोणें केलासी रे देव। आमुच्या जाणिया खेंच आणियेला। ३ ।
माझें बाळ तुझ्या दर्शनासी आलें। तें त्वां भुलविलें केशिराजा। ४ ।
रात्रं दिवस तुझ्या नामाचा रे छंद। गोविंद गोविंद म्हणतसे। ५ ।
तहानभूक विसरला पिसाट पैं झाला। नोळखे मजला काय करूं। ६ ।
परतोनि संसाराची सांडियेली आस। बोलतो उदास सर्वांपरी। ७ ।
लोकांची लेंकुरें कां गा चाळविसी। आपणया ऐसें करसी भलत्यासी। ८ ।
आणिक असतां नाश वेगळा थोर। मग माझा विचार कळतां तुज। ९ ।
तुज एक वर्म पुंडलीक आहे। जेणें जडविले पाय विटेवरी। १० ।
याहुनी आणिक अधिक पावसी। आम्हां दुबळ्यांसी कष्टवितां। ११ ।
मागें पुढें तुज ऐसेंची फावलें। तें तंव नचले मजसी कांहीं। १२ ।
जीव मी देईन कीं नामा नेईन। नांव मी करीन गोतां माजी। १३ ।
आतां बरवें विचारीं अगा ये श्रीहरी। माझा नामा करीं मज आधीन। १४ ।
नाहीं तरी जीवित्व वेंचीन तुझ्या पायीं। विनविते गोणाई केशिराजा। १५ ।

१५२. अगा ये विठोबा पाहें मजकडे। कां गा केलें वेडें बाळ माझें। १ ।
तुझें काय खादलें त्वां काय दिधलें। भलें दाखविलें देवपण। २ ।

आम्ही म्हणूं तूं रे कृपाळू असती। आतां तूं कळलासि पंढरीराया। ३ ।
कां रे देवपण आपुलें भोगूं पै जाणावें। भक्तां सुख द्यावें हेळामात्रें। ४ ।
देव देव होऊनियां अपेश कां घ्यावें। माझें कां बिघडावें एकुलतें बाळ। ५ ।
तूं कैसा रे देव या देशावेगळा। बांधितें तुझा गळा परि संतां भ्यालें। ६ ।
तुझी करणी अवघी आम्हां ठाउकीच आहे। बोलोनियां काय हलकट व्हावें। ७ ।
जाणोनि पुंडलिक तुझी न पाहेचि वास। तूं भला नव्हेस घरघेणा। ८ ।
तो बैस पैं न म्हणे तुज याचका कारणें। जडसी जीवें प्राणें सात्विक भावें। ९ ।
झणीं तूं आपुला करिसी बोभाट। मग येईल वीट लोकाचारीं। १०।
थोरपणें नामा करीं मज आधीन। गोणाई म्हणे चरण धरीन तुझे। ११।

१५३. माझा नामा जंव नाम रूपासी आला। जो म्हणों लागला घरदार। १ ।
तंव कैसें विघ्न उदेलें गे माये। नामा पंढरीरायें भुलविला। २ ।
सांग बा विठ्ठला म्यां काय केलें। नाम्या कां भुलविलें कवण्या गुणें। ३ ।
आम्ही गा शिंपीये अनाथें पैं दीनें। करूं शिवणें टिपणें पोट भरूं। ४ ।
त्यासी तुवां आणियेला क्षयो। कैंचा आम्हां देवो निर्मिलासी। ५ ।
असता चराचर न बुडतां हे सृष्टी। कां गा घेसी पाठी दुर्बळीची। ६ ।
एक बाळ माझें धरिली त्याची आस। त्या कैसी निराश मांडीयेली। ७ ।
दिसां मासां गर्भ जाणोनियां पोटीं। त्याची आस मोठी करिती लोक। ८ ।
एवढा माझा नामा कैसेंन विसरेन। देईं कृपादान दुर्बळीसी। ९ ।
तूं अनाथा गोसावी दीनाचा कैवारी। तें ब्रीद श्रीहरी काय झालें। १०।
विघडिलें पाडस करीं एकेठायीं। विनविते गोणाई केशीराजा। ११।

१५४. बुडविली क्रिया बुडविलें कर्म। बुडविला धर्म पाहा येणें। १ ।
तुझिया नामाचें लागलेंसे पिसें। असोनि न दिसे लोकाचारीं। २ ।
नेणों काय कळे तुवा वागविला। संबंधु तुटला मज नाम्याचा। ३ ।
बुडविला आचार बुडविला विचार। बुडविला संसार कुळासहित। ४ ।

आपुलें पारिखे सर्वथा सारिखें। नेणों कवणा सुखें वेडावला। ५ ।
बुडविला मोहो बुडविली ममता। बुडविली अहंता मीतूंपण। ६ ।
हा नेणे वेव्हार कां इंद्रियांचें सुख। अखंड याचें लक्ष तुझे पायीं। ७ ।
बुडविली कल्पना समुळीं वासना। बुडविली सेवा त्रिविध कैसी। ८ ।
हांसे नाचे प्रेमे फुंदतु डुल्लतु। अहर्निशीं गातु नाम तुझें। ९ ।
असोनि नसता केला ये संसारीं। म्यां वाहिला उदरीं तैसा नाहीं। १०।
गोणाई म्हणे देवा त्वां केली निरास। चाळविलें उदास बाळ माझें। ११।

१५५. विश्वजन मोहना कपटिया नारायणा। काय देवपणा मिरवितोसी। १ ।
दर्शना आलिया हृदयीं संचरसी। देहभाव घेसी हिरोनियां। २ ।
या विश्वावेगळें नवल तुझें करणें। सांगावें गाऱ्हाणें कोणापासीं। ३ ।
सर्वांग सुकुमार परी हृदयीं कठीण थोर। नेणसी जिव्हार मज दुर्बळीचें। ४ ।
मज अनाथाचें बाळ वेधोनि मोहिलें। बहुत दु:ख झालें सांगों कोणा। ५ ।
कासया पितृभक्ती पुंडलिकें केली। विवसी आणिली पंढरीसी। ६ ।
माय दुखऊनी मोहिसी बाळकें। देवपण निकें कैसें तुझें। ७ ।
यातें अनुसरल्या कैचीं बाप माय। नाठवेची सोय संसाराची। ८ ।
ऐसियानें संग धरिला तुझा देवा। प्रत्यक्ष अनुभवा आलें मज। ९ ।
माझिया मनींचें जाणोनियां गुज। कांहीं एक तुज सांगेन मी। १०।
माझा नामा लावी संसाराचे सोई। विनविते गोणाई केशवातें। ११।

१५६. काय थोरपण मिरविसी व्यर्थ। खोटेपण स्वार्थ कळों आलें। १ ।
हिता अनहिता केले आपस्वार्थ। वचन यथार्थ बोल आतां। २ ।
होसी कलिमाजी कलिसारिखाची। भोळ्या भाविकाच्या भक्तिकाजा। ३ ।
गोणाई म्हणे माळ घातिली स्वहस्तें। करितोसि दंडवत निमित्यासी। ४ ।

संत नामदेवांना देवानी माळ घातली.

१५७. बहूत दिवस भरले पैं गोपाळा। अगा ये विठ्ठला कणव नये। १ ।
नामा माझा वेगीं देईं माझ्या हातीं। जाऊं दे परती अनाथनाथा। २ ।

खाऊं जेऊं तुज असोस पैं देऊं । किर्ति तुझी गाऊं जगामाजी। ३ ।
तुज काय उणें ब्रह्मांडनायका। नव्हेसी मजसारिखा एकदेसी। ४ ।
अनंत ब्रह्मांडें क्षणें घडामोडीसी । कां मज दुर्बळीसी कष्टविलें। ५ ।
तुज दुजेपणाचा सहज आला वीट। तूं तंव एकट एकलाची। ६ ।
ऐसी कीर्ति वेद वर्णिती पुराणें। तें कां लाजिरवाणें करिसी देवा। ७ ।
तूं कृपेचा कोंवळा म्हणति विश्वजन । त्या तुझें निर्वाण कळलें नाहीं। ८ ।
मैंद मुद्रा धरणें गळां तुळसी माळा । निवटितोसि गळा न कळतां। ९ ।
आतां आपुला भ्रमु राखे तो शहाणा । झणीं माझ्या निर्वाणा पहासी देवा। १० ।
गोणाई म्हणे माझा नामा देउनी हातीं । अंगिकारीं कीर्ति पंढरिराया। ११ ।

१५८. निर्गुणपणाचा अभिमान सांडिला। निगम लाजविला नारायणा। १ ।
कपट करोनि भक्तांसी तारिसी। तुझा तूं ठकसी पंढरीराया। २ ।
ठकुनी पुंडलिकासी न्यावया वैकुंठासी। या बुद्धी आलासी पंढरीये। ३ ।
तंव त्या भक्तराजें धरियेलें चित्तें। परतोनि मागुतें जाऊं नेदी। ४ ।
अठ्ठावीस युगें गेलीं विचारितां। निर्गम सर्वथा नव्हे देवा। ५ ।
मग कटावरीं कर धरोनियां धीर। उभा निरंतर राहिलासी। ६ ।
सर्व प्रेमें तें हिरोनि बांधिलें। विचारें साधिलें कोणें कोणा। ७ ।
द्वारीं द्वारपाळ झालासी अंकित। सांग बुद्धिमंत कोण ऐसा। ८ ।
नाथिलेंची करिसी आपणा गोविसी। बोल कां ठेविसी नामयातें। ९ ।
गोणाई म्हणे तुझें नकळे विंदान। देईं कृपादान बाळ माझें। १० ।

१५९. माझें घर त्वां पूर्वींच बुडविलें। जे दर्शनासी आलें बाळ माझें। १ ।
नेणों काय वर्म तुझें सांपडलें हातीं। रिघालासी चित्तीं जेणें द्वारें। २ ।
लौकिक परिहार देसील कासया। मी तुज ऐसिया बरें जाणें। ३ ।
कटीं कर ठेउनी उभा गरूडपारीं। हें तंव अंतरीं हारपला। ४ ।
नाहीं चळणवळण न लावी पात्या पातें। लागलें निरूतें लक्ष तुझें। ५ ।

तुझी याची खूण अंतरींची येकी। दाविसी लौकिकीं भिन्नपण। ६ ।
सांडियेली येणें लौकिकाची लाज। नव्हे माझा मज कांहीं केल्या। ७ ।
तुझेनि सुखें धाला अनारिसा झाला। अभिमान मावळला समूळ याचा। ८ ।
देहीं पैं असोनी विदेही दिसत। प्रेमें वोसंडत हृदयकमळीं। ९ ।
तूं अनाथा कैवारी ऐसी वेदवाणी। परी कां नये अजोनि कणव तुज। १०।
गोणाई म्हणे माझा नामा देईं हातीं। लागेन पुढतां पुढतीं तुझे पायीं। ११।

१६०. लावोनि भवभय तुवां केलें साचें। देह नव्हे याचें ऐसें केलें। १ ।
सुखभोग सर्व दिला टाकोनियां। नेणें तुझ्या पायां परतें कांहीं। २ ।
ऐसें काय केलें नाम्या चाळविलें। समूळ बुडविलें आपणा माजी। ३ ।
आम्हां दुर्बळांचा करोनियां घात। केला वाताहात घराचार। ४ ।
आतां तुजवीण कोणाचे साउली। पाळीली पोसिली तुझी देवा। ५ ।
संकटीं उदरीं वाहिली म्यां आशा। होता भरंवसा थोर याचा। ६ ।
तंव त्वां आपुल्या लावियेला सोई। नव्हे मज कांहीं ऐसा केला। ७ ।
काया वाचा मनें सांडोनियां मज। अनुसरला तुज मनोभावें। ८ ।
नकळे तुझी माव काय या दाविलें। परतेनासें केलें चित्त याचें। ९ ।
आतां माझा शीण निवारील कोण। एका तुजवीण पांडुरंगा। १०।
गोणाई म्हणे देवा देईं जीवदान। सुखाचें निधान नामा माझा। ११।

१६१. अरे विठोबा आतां पाहें मजकडे। कां रे केलें वेडें बाळ माझें। १ ।
तुझें उच्छिष्ट खादलें त्वां काय दिधलें। भलें दाखविलें देवपण। २ ।
आधीं त्वां तयाचें भोगुं पैं जाणावें। भक्ता सुख द्यावें आनंदाचें। ३ ।
गोणाई म्हणे देवा तुज बांधलें दावें। तरी तुज भ्यावें लागे संतां। ४ ।

१६२. राही रखुमाई सत्यभामा माता। शिकवा वो कांता बहुतां परी। १ ।
संत सनकादिक साक्ष हे सकळ। येणें माझें बाळ चाळविलें। २ ।

हा काय आमुचा धनी कीं गोसावी। नाहीं तें शिकवी लेंकुरासी। ३ ।
झाला देव तरी पडों याच्या पायां। मैंदावें केलिया भलें नव्हें। ४ ।
भीड तुटलिया नेईन चौघां चारीं। होईल समसरी याची मज। ५ ।
देव कांहीं आम्हीं नसति ऐकिले। परी नाहीं देखिलें ऐसे कोठें। ६ ।
दर्शनेंचि जेथें जिवित्वाची हानी। नाठवे परतोनि घराचार। ७ ।
कैंची वो पंढरी मी वो काय जाणे। याच्या पुत्रपणें देखियेली। ८ ।
या देवासी भेटीं जन्म मरण तुटी। मावळली गोष्टी संसाराची। ९ ।
तुम्ही अवघ्याजनीं याच्या सांगातिनीं। पुसा याचे मनीं काय आहे। १०।
देऊनियां नामा मज लावा वाटे। गोणाई म्हणे वोखटे न करीं देवा। ११।

१६३. ऐकें गोणाई म्हणे केशिराज। सदा अरज तुझे नामदेवा। १ ।
संसारादि यासी नावडेचि कांहीं। मिठीच वो पायीं घातलीसे। २ ।
नेणों याच्या जीवें घेतलेंसे कांहीं। लोळणीच पायीं घातलीसे। ३ ।
पुसें वो जीवींचें काय काय आवडे। उमगोनि कोडें नेईं यासी। ४ ।
देतां कांहीं न मागे नसतां कांहीं नेघे। गुज पैं न सांगे अंतरींचें। ५ ।
जन्मोनि सांकडें घातलें वो कैसें। गिळील मज ऐसें वाटतसे। ६ ।
मी भावासि भुललों सांपडलों याचे हातीं। करिल काय अंतीं नकळे कांहीं। ७ ।
एक वेळ मज सोडवीं यापासोनि। दे कां मज लागोनि जीवदान। ८ ।
माझिये पैं बोलें मजचि गोविलें। यातें आपंगिलें अनाथ म्हणोनि। ९ ।
अंगोळिये धरितां खांदीं वोळंगलें। आतां माझें केलें न चले कांहीं। १०।
तूं आपुलिया मनीं विचारूनि पाहीं। नामा आपला नेईं आवडता। ११।
मायलेंक दोघे साम्राज्य करा। घ्यावें धणीवरी सुख याचें। १२।
कठिण बोल तुझे बहुसाल ऐकिले। नाहीं त्वां गे पाहिलें मागें पुढें। १३।
चित्त तुझें कैसें सांठविलें माया। मज करिसी वांयां इष्ट तुटी। १४।
आतां तुझी कैसी झांकोळिली माया। मज करिसी वांयां इष्ट तुटी। १५।

ऐसें देवाचें बोलणें ऐकोनि उदास । नामया झाले क्लेश तयेवेळीं । १६ ।
नामा म्हणे देवा ऐसें कैसें घडे । सृष्टिही पैं बुडे तरी न सोडीं तुज । १७ ।

१६४. थिते माझें प्रेम घेऊनि बैसला । अझुनि नुठी वहिला नामा तुझा । १ ।
जीवें भावें सर्वस्वें घेतलें धरणें । म्यां काय करणें ऐशियासी । २ ।
कासया अपराध ठेविशील मज । शिकवितें तुज नाहीं कोणी । ३ ।
संसारा गांजले जन्ममरणा उबगले । म्हणोनि शरण आले भयाभीत । ४ ।
कृपा उपजली जीवें अनुसरला । जीव याचा गुंतला माझे ठायीं । ५ ।
दवडितां वेगळें वोसंगा रिघालें बळें । बोलतां हें साळेंभोळें करूणावचनीं । ६ ।
तेणें माझें हृदय कळवळलें । म्हणोनि देखतां डोळे निवती माझे । ७ ।
शरण आलिया तें म्यां जरि अव्हेरावें । कोणें आपंगावें सांग सत्य । ८ ।
शत्रुमित्र आदिकरूनि सकळ । दुःख अळुमाळ पडों नेदी । ९ ।
संसाराची येणें सांडियली सोयी । प्राणें माझ्या ठायीं अनुसरला । १० ।
आतां याची लटिकी करीं दूर आस । नामा म्हणे उदास सर्वस्वासी । ११ ।

१६५. तुझा नामा तुज व्हावा जन्मोजन्मीं । काय यासी आम्ही करू शकों । १ ।
मर्यादा सांडोनि बोलसी कठिण । करिसी वायांवीण इष्ट तुटी । २ ।
ऐसें कांहीं सुख अनुपम्य दाखवीं । जया ओळखी जीवीं निजरूपा । ३ ।
जेणें लोभें त्याचें मन मागें मोहरे । वृत्तीसहित वीरे ठाईं ठाईं । ४ ।
तेणें या जन्माचे विसरोनि संताप । सोय आपेंआप धरील तुझी । ५ ।
जरी तूं देखतीस स्वहित पूर्वी याचें । तरी कां चित्त त्याचें त्रास घेतें । ६ ।
संसार करितां कांहीं न देखेची सुख । म्हणोनि विन्मुख झाला तुज । ७ ।
वरपंगाचें पेहें पाजिसिल काय । हा निजसुखीं धाय ऐसें करीं । ८ ।
तरीच तूं निजाची लोभापर माता । म्हणोनि श्लाघ्यता जगामाजी । ९ ।
आतां असो सहज येणें वीण काय काज । मी बोलिलों तुज कळेल तें करीं । १० ।
नामा म्हणे देवा ऐसें काय केलें । काय तुज वेगळें जीवन माझें । ११ ।

१६६. वाचेचेनी बळें बोलसी आगळें। मर्यादे वेगळें वायांवीण। १ ।
भ्रमलीसी आरजे न पाहसी आपणाकडे। धारिष्ट केवढें पाहें तुझें। २ ।
नेईं आपला नामा काय चाड आम्हां। जरी आहे तुज भ्रम ममत्वाचा। ३ ।
पाहेपां पूर्वीचा कवणीये जन्मींचा। नकळे तुझा याचा ऋणानुबंध। ४ ।
तो सरला कीं उरला विचारितां आपुला। हा तुज अंतरला कवण्या गुणें। ५ ।
येणें सांडिला संसार वेव्हार लौकिक। अविद्या अहंभाविक दोन्हीं नाहीं। ६ ।
हा प्रपंचावेगळा नकळे याची लीळा। लागलासे डोळां प्रेम मुद्रा। ७ ।
ऐसी याची स्थिति देखोनियां डोळां। मज कां वेळोवेळां छळितेसी। ८ ।
जाणसी त्या परी बुजावीं वो यातें। जेणें सुखें तूतें ओळखिला। ९ ।
याचेनि संसार चालवीन म्हणोनि। ऐसी भ्रांती मनीं धरिली वायां। १०।
नामा तरी निमाला आम्हा अनुसरला। तरंगु विराला जळीं जेवीं। ११।

१६७. तुझिया नामयानें बळी देउनी चित्त। जन्मोनियां आप्त केलें मज। १ ।
इष्ट मित्र बंधु जननी जनक। सर्व मीच एक करूनि ठेला। २ ।
ऐसी याची करणी अजोनि नेणसी। बाळ माझें म्हणसी चाळविलें। ३ ।
प्रेमाचें लाघव लाउनि माझ्या पायीं। बांधलें हृदयीं धरोनियां। ४ ।
वृत्तिसहित मन लाविलें राखण। केलें जीवें जतन मजलागीं। ५ ।
उचंबळले नयन अंतरींच्या अनुरागें। रात्रंदिवस जागे माझ्या ठायीं। ६ ।
बोले चाले परी लक्ष मजवरी। बाहेरी भीतरीं मज देखे। ७ ।
सर्व सुख गुणा रूपा देउनी मिठी। आणि निर्गुणीं हिंपुटी होऊं नेदी। ८ ।
न मागे न घे न धरी सोय संसाराची। कल्पना देहींची मावळली। ९ ।
ऐसें येणें मज विश्वासी गोविलें। सर्वत्र लाविलें मजची कडे। १०।
निर्गुणीं हा नामा न सोडी सर्वथा। सांपडला आतां एकरूपा। ११।

१६८. नामयासारिखें निधान तुझे कुसी। धन्य तूं वो होसी जगामाजी। १ ।
धन्य याचें सुख देखियेलें डोळां। प्रेमाचा जिव्हाळा अलौकिक। २ ।

धन्य तुझें कूळ धन्य तुझा वंश। दीपासवें प्रकाश दिसे जेंवी। ३ ।
धन्य तुझी काया धन्य वाचा मन। करविलें स्तनपान नामयासी। ४ ।
धन्य हा दिवस तुवां केलें सार्थक। खेळविलें कौंतुकें नामयासी। ५ ।
धन्य तुझें भोजन नाहीं नामयाविण। धन्य उदकपान केलें तुवां। ६ ।
धन्य विश्रांतीसी केलें त्वां शयन। वोसंगा घेऊन नामयासी। ७ ।
धन्य तुझे कर कुरवाळिला नामा। धन्य तो संभ्रमा स्नेह तुझा। ८ ।
धन्य कृपा दृष्टी नामयातें पाहिलें। केस कुर्वाळीले बाळपणीं। ९ ।
धन्य तूं वो ऐसी जन्मोनियां धन्य। तुझें नाम धन्य मिरवत।१०।
धन्य तुझा नामा ज्याची भेटी आम्हां। धन्य त्याचा प्रेमा नित्य नवा।११।

१६९. माझा नामा मज देईं। जीव देईन तुझे पायीं। १ ।
पुंडलिका भुलवीलें। तैसें माझें बाळ केलें। २ ।
तें गा नचले मजपासीं। देगा माझ्या नामयासी। ३ ।
तुज संगती जे लागले। ते त्वां जितेची मारिले। ४ ।
विठ्ठल म्हणे गोणाई। आपुला नामा घेऊनी जाईं। ५ ।
हातीं धरोनियां गेली। गोणाई तेव्हां आनंदली। ६।

१७०. हरी त्वां कोणाचें बरवें केलें। पूर्ण आम्हां कळों आलें। १ ।
नारद वैष्णव जगजेठी। त्यासी लाविली लंगोटी। २ ।
मयुरध्वज राजा भला। त्यासी कर्वतीं घातला। ३ ।
बळी दानशीळ भला। तुवां पाताळीं घातला। ४ ।
भीष्म वैष्णवांचा राव। त्याचा बाणें पुजिला ठाव। ५ ।
रूक्मांगद हरिचा दास। त्याचा गांवच केला वोस। ६ ।
बाळ एकुलतें एक। तो त्वां ज्ञानीच केला शुक। ७ ।
उपमन्यु बाळक पाहें। क्षीरसागरीं कोंडिलें आहे। ८ ।
धुरु बाळक गोजिरवाणें। त्याचें खुंटलें येणें जाणें। ९ ।

हरिश्चंद्र ताराराणी। डोंबाघरीं वाहे पाणी। १०।
प्रल्हाद भक्तीचा भुकेला। त्याचा बाप त्वां वधिला। ११।
हनुमंत भक्त निकट। त्यासी केलें तूं मर्कटा। १२।
पुण्यवंत राजा नळ। त्याचा केला तुवां छळ। १३।
श्रियाळ राजा भला। त्याचा बाळ त्वां खादला। १४।
तुज कोणी न म्हणे भलें। बाळ पोटींचें कोंवळें। १५।
जिकडे तिकडे तुम्ही दोघें। तिकडे तिसरा नामा मागें। १६।
तुज नाहीं जाती कुळ। जेउनी भ्रष्टविलें बाळ। १७।
जेणें तुझें नाम घेतलें। ते संसारा वेगळे केले। १८।
आतां जेविसी तरी तुज आण। ऐकोनि हांसे जगजीवन। १९।
नामा दिला माते हातीं। नयन भरले अश्रुपातीं। २०।
माय पाहे नामदेव। तंव तो झाला केशवराव। २१।
माय म्हणे नये कामा। तुझा ओपिला तुज नामा। २२।
गोणाई म्हणे हरी। तुझी करणी तुजची बरी। २३।

१७१. मग पंढरीनाथ म्हणे नामयासी। तूं जाई गोणाईसि घेऊनियां। १।
अतिशय कहार इनें मांडिलासे फार। मातेसि निष्ठुर होऊं नये। २।
स्तनपान देऊनि मोहें पाळिलासी। अंतर तियेसी देऊं नये। ३।
नामा म्हणे शरण आलों माये भेणें। तिचे हातीं देणें उचित नव्हे। ४।

१७२. देव झाला नामा नामा झाला देव। गोणाईचा भाव पहावया। १।
हा घे तुझा नामा काय चाड आम्हां। आनंदाचा प्रेमा गोणाईसी। २।
हातीं धरोनियां घेउनी चालिली। फिरून पाहती झाली तंव तो देव। ३।
अगा माझ्या बापा तूं कोणा हवासी। मज दुर्बळीसी काय होय। ४।
सोळा सहस्र मुख्य अष्ट तुझ्या कांता। त्या माझ्या घाता प्रवर्ततील। ५।
पुंडलीकासी तुवां दिधली आहे भाक। गोणाई म्हणे ठक बहु होसि। ६।

चढा वोढी गुरू करिती। मग सुबुद्धिही टाकिती।
त्यासी यमाघरीं प्राप्ति। रवरवाची ।५५।
सद्‌गुरूसेवा तें मोक्षपद। सद्‌गुरूसेवा तें आनंदपद।
सद्‌गुरू सेवा तो ब्रह्मावबोध। कैवल्यप्राप्ती ।५६।
असो ऐसिया परी। जो सद्‌गुरू वाक्य वाहे शिरीं।
तोचि ब्रह्मविद्येसी अधिकारी। हरिहरां वंद्य तो ।५७।
ऐसे नामदेवाप्रती श्रीहरी। स्नेह साक्षेपें निरूपण करी।
ऐकोनियां चरणावरी। सद्‌गदीत होउनि लोटला।५८।
देवा तूं होवोनि माझी दिवटी। गुरू निधान दाखवीं दृष्टी।
जेणें करुनी भवबंध गांठी। सुटेल सर्वथा ।५९।
मग कळवळोनि श्रीहरी। नामदेवातें पोटासीं धरी।
जाय पावशील झडकरी। हस्त विसा खेचराचा ।६०।
तेणें नामयासी समाधान। देवही झाला सुखसंपन्न।
नामा पावोनि ब्रह्मज्ञान। मिळशील माझ्या स्वरूपीं ।६१।
ऐसे हें देवभक्त निरूपण। प्रथम शिष्यासी करी श्रवण।
मग दीजे पूर्णपणे। म्हणे नामा ।६२।

२९६. अनाथांचा नाथ तुझी ब्रिदावळी। मज कारे जाळी भवव्यथा। १।
देव म्हणे नामया गुरू वांचुनियां। मुक्ति पावावया आन नाहीं। २।
आन नेणें कांही करिसी वित्पत्ति। नव्हे माझी प्राप्ति गुरूवीण। ३।
जाईं नामया जाईं गुरूसी शरण। तुटे भवबंधन तुझें वेगीं। ४।
नामा म्हणे देवा कवणा शरण जाऊं। कोणा मी होऊं शरणागत। ५।

२९६ अ. देव म्हणे नामया विसोबा खेचरासी। शरण तयासी जावें वेगीं। १।
इतुकें ऐकोनि नमियेलें देवा। चालियेला तेव्हां विसोबापाशीं। २।

चिंताग्रस्त नामा आला आंवढ्यासि । पुढें देउळासी देखियेलें । ३ ।
नामा तयेकाळीं गेला देउळासी । देउळीं कौतुकासी देखियेलें । ४ ।

२९६ ब. देवावरी पाय ठेवुनि खेचर । निजेला परिकर निवांतचि । १ ।
देखोनियां नामा पावला विस्मया । कैसा हा प्राणिया देवो नेणों । २ ।
उठींउठीं प्राण्या आंधळा तूं काय । देवावरी पाय ठेवियेले । ३ ।
विसोबा खेचर बोले नामदेवा । उठविलें जिवा कारे माझ्या । ४ ।
देवावीण ठाव रिता कोठें आहे । विचारोनि पाहें नामदेवा । ५ ।
जेथें देव नसे तेथें माझे पाय । ठेवीं पां अन्वय विचारूनी । ६ ।
नामा पाहे अवघा जिकडे तिकडे देव । कोठें रिता ठाव न देखेची । ७ ।

२९७. इतुकें देखोनि चरणीं घाली मिठी । सांठवला सृष्टीं अवघा देव । १ ।
तिहीं त्रिभुवनीं आपण व्यापुनी । आनंदें कोंदोनि राहियेला । २ ।
श्रीगुरुचे पाय जीवें न विसंबत । मनोवृत्तिसहित ओंवाळिलें । ३ ।
डोळियांचे डोळे उघडिले जेणें । आनंदाचें लेणें लेवविलें । ४ ।
जन्ममरणाचें तोडिलें सांकडें । कैवल्यची पुढें दावियेलें । ५ ।
कैवल्याचा गाभा विटेवरी उभा । दिसे दिव्य शोभा पांडुरंग । ६ ।
नामा म्हणे माझी भक्ति हे माउली । कृपेची साउली केली मज । ७ ।

## श्रीगुरु विसोबा खेचर यांचा संत नामदेवास बोध

२९८. खेचरीं धरिली माव लिंगावरी ठेविला पाव । पहावया भाव नामयाचा । १ ।
नामा तेथें आला देव नमस्कारिला । देखोन बोलला वचन त्यासी । २ ।
लिंगावरोनि चरण काढाजी वहिले । दिसतां वरी भले करणी न कळे । ३ ।
तंव येरू बोलिला नामया तूं भला । मज नाहीं कळला देव तुझा । ४ ।
जेथें नाहीं देव तेथें ठेवीं पाव । सर्वज्ञ सदैव तूंची अससी । ५ ।

मीपणें भूललों मज नकळेची कांहीं । देव नसे ते ठायीं पाय ठेवीं । ६ ।
तंव नामा होय विचारिता शब्दाची कुसरी । पाहतां निर्धारीं सान नोहे । ७ ।
देवावीण ठाव हें बोलणेंची वाव । परतोनि संदेह पडला मज । ८ ।
आपुले उमाणे आपण उमगावें । मजसी तारावें भवसागरीं । ९ ।
नामा धरी चरण अगाध तुमचें ज्ञान । आपुलें नाम कोण सांगा स्वामी । १० ।
येरू म्हणे खेचर विसा पैं जाण । लौकिकी मिरवणें अरे नामया । ११ ।
नाम आणि रूप दोन्हीं जया नाहीं । तोचि देव पाहीं येर मिथ्या । १२ ।
जळ स्थळ आणि काष्ठ हे पाषाण । पिंड ब्रह्मांड व्यापून अणुरेणु । १३ ।
सर्वत्र साक्षभूत हे जाणोनि पाहो । खेचर म्हणे नामयातें अवघा देवो । १४ ।

२९९. नामदेवा काय करसी तीळ तुळसी । उभा गा ठेलासी दर्भ जैसा । १ ।
भुका कां गा मरसी जेथींचा तेथें । केशवराज तूंतें आंतुडेना । २ ।
नाहीं दया ध्यान ईश्वरीं भजन । वांयांवीण प्राण कां करितोसी । ३ ।
हरिभक्तिवीण जन्मला जो नरु । म्हणे विसोबा खेचरू अरे नामया । ४ ।

३००. तुझें निजसुख तुजपाशीं आहे । विचारूनी पाहें मनामाजी । १ ।
विवेकवैराग्य शोधुनियां पाहे । तेणें तुज होय ब्रह्मप्राप्ती । २ ।
ज्ञानाचा प्रकार सहजची झाला । अहं भाव गेला गळोनियां । ३ ।
खेचर विसा म्हणे जेथें ओंकार निमाला । सहजची झाला ब्रह्ममूर्ती । ४ ।

३०१. जरी म्हणसी देव देखिला । तरी हा बोल भला नव्हे नामया । १ ।
जोंवरी मी माझें न तुटे । तंव आत्माराम कैसेनि भेटे । २ ।
खेंचर साह्यानें मी कांहीं नेणें । जीवा या जीव इतुलें मी जाणें । ३ ।

३०२. मेघेंवीण जळ कीं जळेंविण पूर । परि नाहीं उतार तेथें नख न भिजे । १ ।
आहे तें तें बुडे नाहीं तें तें तरे । लटकीयाचें खरें वाढविसी । २ ।
म्हणे खेचर विसा तूं झालासी पिसा । दृश्याची हे आशा सांडीं नामया । ३ ।

३०३. सुखाचें सुखरूप घेउनी जा तरी । विठ्ठलनामें भरी तिन्ही लोक। १ ।
आशापाश याहीं वासना पोखी। विठ्ठलनामा शेखीं घेउनी राहें। २ ।
नलगती सायास करणें काया क्लेश। आपण वैकुंठ येईल सवें। ३ ।
नाठवी संसार नाठवी देहभाव । रोहिणीची माव नकळे काय। ४ ।
कुल्लाळकुसरीं भ्रमत चक्र । आयुष्या आवर्त मापा करी। ५ ।
खेचर विसा म्हणे येथुनी काढिलें । तें तुज दिधलें जारे नामया। ६ ।

३०४. श्रवणीं सांगितली मात मस्तकीं ठेवियला हात । पदपिंडाविवर्जित केला नामा। १ ।
खेचरू विसा प्रेमाचा पिसा। तेणें नामा कैसा उपदेशिला। २ ।
तया सांगितलें गुज। आतां पाल्हाळीं तुज काय चाड। ३ ।
मग खेचरू म्हणे मज ज्ञान हेंचि गुरू । तेणें अगोचरू म्हणे केला नामा। ४ ।

३०५. सुखालागीं मन तुझें गिवसीत तळमळी । परी सुख आहे जवळी नकळे तुज। १ ।
दर्पणीं दीप्ति कीं दुग्धीं घृतशक्ति। परी करणीविण हातीं न लभेची जाण। २ ।
सुखालागीं सुख सोय दाखवीन पाहें। अनुभवोनि होय सुखरूप। ३ ।
सुख तें शांति सुख तें दया क्षमीं। सुख ते उपदेश मी निर्विकारीं। ४ ।
सुख तें नैराश्य सुख हरिदास्य । सुख तें विश्वास सदा वसे। ५ ।
सुख तें सत्संगती सुख तें नामी प्रीती । सुख तें विकृति विषय भोगी। ६ ।
सुख तें एकांतवास सुख तें लौकीक त्रास । सुख तें सौरस स्वस्वरूपीं। ७ ।
म्हणे खेचरविसा परीयेसीं विष्णुदासा । न घडे भरंवसा तरी अनुभवणे। ८ ।

३०६. भक्ति त्रिविधा षड्विध नवविधा। यजन याजने जीवातें दंडिताती सदा। १ ।
केशव परमात्मा नेणोनियां जीं पतितें । पतनीं पडतां होतीं भूतें रया। २ ।
नाहीं रूप स्थिती नाही शब्द स्थिती। नित्य तया वस्ती निरंजनीं। ३ ।
एकलें परब्रह्म गुरुमुखें जाणावें। तरी चुकवावें पुनरावृत्ति रया। ४ ।
ऐसें रे नामया वचन ऐक पुढें। हे तो देवाविषयी श्रुतिचे निवाडे। ५ ।
श्रुती नेती नेती परतोनि आलिया। खेचर पुढें सांगे नामया। ६ ।

३०७. आधीं चैतन्य अर्पैतें करोनी। मग संचरे तारूण्य वनीं।
कामक्रोध तुज देखोनी। जाती पळोनी बारा वाटा। १।
तुज पाठी कवण धांवे। कवण टाकी कवण पावे।
कामक्रोधें जग मोहावें। कासियासी खोवावे पोटीं पाय। २।
माया मोहजाळ तुटेल। पळेल पां काळ व्याळ।
कारे स्मरसी ना गोपाळ। मिथ्या व्याकुळ कांजेवीण। ३।
वैराग्ये दृढ होईं निरूता। कासया भितोसी चपेट घाता।
परस्त्री तितुकी मानीं माता। विषयीं निमित्या आल्यासाठीं। ४।
धर्माचेनी मार्गें निघाला कर्ण। शिबी चक्रवती झाला जीवित्वहीन।
तयामाजी सांग नाडला कोण। लटकी झकवण कां बोलती। ५।
इंद्रिया गोड तें आरोगिजे। मग धनीवरी धांवा पोखारिजे।
काय सांगूं शहाणपण तुझें। खेचर विसा म्हणे अरे नामया। ६।

३०८. येथोनि तेथवरी धांवोनियां गेलों। कांहीं नाहीं तें पाहुनियां आलों। १।
कोठें गेलों कोठें धांवुनी आलों। कांहीं नाहीं तें पाहुनियां धालों। २।
खेचर विसा म्हणे नामदेवा। कांहीं तें तुम्हीं मज दाखवा। ३।

३०९. पर्वतप्राय पापराशी होती दग्ध। वाचेसी मुकुंद उच्चारितां। १।
अच्यूत श्रीहरी केशव नरहरी। माधव हरहरी रामकृष्ण। २।
नामाचे साधन करशील पूर्ण। ते प्रपंचाचें भान उरों नेदी। ३।
उदासीन वृत्ति आचरावें कर्म। नाहीं देहधर्म गुण माया। ४।
ऐसा हा अनकळीत मार्ग साधेल तुज। खेचर विसा गुज सांगे नामया। ५।

३१०. आप तेज वायु पृथिवी गगन। मेलें तें कवण पांचामध्यें। १।
आम्हां मरण नाहीं मरशील काई। आत्मवस्तु पाहीं श्रीगुरूमुखें। २।
जिताची मरण आलेंसे हातां। मरण बोलतां लाज नये। ३।
खेचर विसा म्हणे आम्हां मरण नाहीं। कैसें मरण पाहीं आलें नामया। ४।

३११. मरण सांगा स्वामी कवणिया गुणें । संसारीं मरण उरलें नाहीं । १ ।
आम्हां मरण नाहीं मेलें होतें काई । श्रीगुरूच्या पायीं राहें मना । २ ।
मरणें हें काया मरणें हें माया । मरे हे छाया कवण्या गुणें । ३ ।
भक्ति अमरकंदु रामनाम वंदूं । नामयासी छंदू विठोबाचा । ४ ।

३१२. सद्गुरूनायकें पूर्ण कृपा केली । निजवस्तु दाविली माझी मज । १ ।
माझें सुख मज दावियेलें डोळां । दिधली प्रेमकळा ज्ञानमुद्रा । २ ।
तया उतराई व्हावें कवण्या गुणें । जन्मा नाहीं येणें ऐसें केलें । ३ ।
नामा म्हणे निकी दावियेली सोय । न विसरावे पाय विठोबाचे । ४ ।

३१३. पाषाणाचा देव बोलेचि ना कधीं । हरि भवव्याधि कैंवि घडे । १ ।
दगडाची मूर्ति मानिला ईश्वर । परि तो साचार देव भिन्न । २ ।
दगडाचा देव इच्छा पुरवीत । तरि कां भंगत आघातानें । ३ ।
पाषाण देवाची करिती जे भक्ति । सर्वस्वा मुकती मूढपणें । ४ ।
प्रस्तराचा देव बोलत भक्तांतें । सांगते ऐकते मूर्ख दोघे । ५ ।
ऐशांचें महात्म्य जे कां वर्णिताती । आणि म्हणविती तेणें भक्त । ६ ।
परंतु ते नर पामर जाणावे । त्यांचे नायकावे बोल कानीं । ७ ।
धोंडा घडोनियां देव त्याचा केला । आदरें पूजिला वर्षें बहु । ८ ।
तरी तो उतराई होय केव्हां काई । बरवें हृदयीं विचारा हें । ९ ।
धोंडापाण्याविण नाहीं देव कोठें । होत सान मोठें तीर्थ क्षेत्र । १० ।
द्वादशीचे गांवीं जाहला उपदेश । देवावीण ओस स्थळ नाहीं । ११ ।
तो देव नामया हृदयीं दाविला । खेचरानें केला उपकारु हा । १२ ।

३१४. सुखाचा सुखतरु सद्गुरू खेचर । स्वरूप साक्षात्कार दाखविला । १ ।
विठ्ठल पाहतां मावळलें मन । ध्यानीं भरले नयन तन्मय झाले । २ ।
मी माझें होतें तें मजमाजि निमालें । जळें जळ गिळिलें जयापरी । ३ ।
तेथें आनंदी आनंदु ओळला परमानंदु । नामया झाला बोधु विठ्ठलनामें । ४ ।

३१५. सद्गुरूचे पाय जीवें न विसंबावे। मन वळवावें वृत्ति सहित। १ ।
डोळियाचे डोळे उघडिले जेणें। आनंदाचें लेणें लेवविलें। २ ।
जन्ममरणाचें फेडिलें सांकडें। कैवल्यचि पुढें दाखविलें। ३ ।
मोहरले तरू पुष्प फळ भारें। तेचि निराकार सनकादिक। ४ ।
नामा म्हणे स्वामी खेचर माउली। कृपेची साउली केली मज। ५ ।

३१६. नाशवंत देतां ब्रह्म येईल हातां। ऐसी ज्याची कथा पुराणांत। १ ।
सद्गुरूचे पायीं देहासि अर्पितां। तात्काळ मुक्तता हातां येते। २ ।
माया देवोनियां ब्रह्म घ्यावें हातीं। ऐशा गुरूप्रति कां भजाना। ३ ।
नामा म्हणे गुरूपायीं लाभ आहे। मोक्ष तोही पाहें दास होतो। ४ ।

३१७. कृपेची साउली अखंड लाधली। खेचर माउली भेटलिया। १ ।
आतां मज भय नाहीं पैं कोणाचें। जन्म मरणाचें दुःख गेलें। २ ।
बोधमोक्षाची फिटली काजळी। समाधि लागली समाधीसी। ३ ।
नामा म्हणे माझें सर्वही साधन। खेचरचरण न विसंबे। ४ ।

३१८. स्वानंदांत पडोनियां जाती। न संडी वासना चघळीत हस्तीं। १ ।
तैसें माझें मन मुरारी। वासना धांवे विषयांवरी। २ ।
डोळियांचीं बुबुळें फुटोनियां जाती। न संडी वासना हालवितों पातीं। ३ ।
ढोराचें पुच्छ मोडोनियां चांगा। पुढती पुढती हालविती पैं गा। ४ ।
वोढाळ ढोरा बांधियेलें काष्ठ। पुढती पुढती धरी तीच वाट। ५ ।
नामा म्हणे माझी मुळीं वासनाच खोटी। खेचर विसा चरणीं घातलीसे मिठी। ६ ।

३१९. सूर्याचा प्रकाश सर्व सृष्टीवरी। धन्य तो अंतरीं सर्व काळ। १ ।
स्वर्गादि पाताळ सर्व पूर्ण जळें। चातका न मिळे मेघाविण। २ ।
नारायण पूर्ण सर्व भूतांठायीं। अभाग्यासि नाहीं तिहीं लोकीं। ३ ।
नामा म्हणे गुरूकृपेचें अंजन। पायाळासी धन दिसे जैसें। ४ ।

३२०. नामा स्वयंपाक करोनि बैसला। केशव श्वानरूपें आला।
रोटी घेऊनि पळाला। सर्वां भूतीं केशव। १ ।
हातीं घेऊनि तुपाची वाटी। नामा लागला श्वानापाठीं।
तूप घे गा जगजेठी। कोरडी रोटी कां खाशी। २ ।
तंव श्वान हांसोनि बोलिले। नामया तुज कैसें कळलें।
येरू म्हणे खेचरें उपदेशिलें। सर्वां भूतीं विठ्ठल। ३ ।

३२१. सुखाचे सोयरे भेटती अंतरीं। बाहेरी भितरी दिधलें क्षेम। १ ।
सुखाची गवसणी घालोनियां मना। विठ्ठली वासना वोल्हावली। २ ।
वाचे उपरम मन झालें तन्मय। लागलासे लय पर लक्षीं। ३ ।
शांति क्षमा दया देती आलिंगन। चित्त समाधान पावविलें। ४ ।
परतलिया दृष्टी इंद्रियांच्या वृत्ती। पावली विश्रांति ठायीं ठायीं। ५ ।
विष्णुदास नामा निजबोधें निवाला। खेचरें दिधला अभयकर। ६ ।

३२२. भक्ति हेचि भावे परब्रह्म पक्वान्न। गुरूमुखें जेवण जेवियलें। १ ।
अनुभव भात लयलक्ष कढी। जेवणार गोडी घेत असे। २ ।
सुख शांति शाखा भावार्थ हा वडा। जेवणार गाढा आत्माराम। ३ ।
दया क्षीरधारीं शांति पूर्णपोळी। घृत हें कल्लोळी प्रेम माझें। ४ ।
विषयाचा गुरळा थुंकोनि सांडिला। नामा आंचवला संसारासी। ५ ।

३२३. वेदांसी न कळे शास्त्रें पैं भांडती। श्रुति विवादती ब्रह्मालागीं। १ ।
ते अवघेचि पैं मुक्त उपदेशधर्मे। हरती कर्माकर्मे गुरूसेवे। २ ।
सेवेपरतें साधन नाही पैं उपदेश। हरीसि सौरस आपेआप। ३ ।
नामा म्हणे हरी गुरू आज्ञा काम। भजन निष्काम गुरूसेवा। ४ ।

३२४. उपजोनि सभाग्य तेचि एक झाले। जिहीं विचारिले आत्महित। १ ।
सांडोनि मीपण सद्गुरूच्या चरणा। लागलों संपूर्ण भावार्थेसि। २ ।
तयाचें जें कांहीं सर्व मज ओझें। नाहीं मज दुजें त्यासि कांहीं। ३ ।

तयाचे हृदयीं संतपण प्रगटे। द्वैतपण तुटे क्षणामाजी। ४ ।
नामा म्हणे आम्हां विठोबाचे बोल। सांपडली ओल तरावया। ५ ।

३२५. अभंगाची कळा नाहीं मी नेणत। त्वरा केली प्रीत केशिराजें। १ ।
अक्षरांची संख्या बोलिले उदंड । मेरू सुप्रचंड शर आदि। २ ।
सहा साडेतीन चरण जाणावे । अक्षरें मोजावीं चौक चारी। ३ ।
पहिल्यापासोनि तिसऱ्यापर्यंत। अठरा गणित मोज आलें। ४ ।
चौकचारी आर्धी बोलिलों मातृका। बाविसाची संख्या शेवटील । ५ ।
दीड चरणाचें दीर्घ ते अक्षर। मुमुक्षु विचार बोध केला। ६ ।
नामा म्हणे मज स्वप्न दिलें हरी। प्रीतीनें खेचरी आज्ञा केली । ७ ।

## संत ज्ञानदेवादिकांची आदि व समाधी

३२६. जगत्रय जीवन अतंर्निष्ठ ज्ञान। तरी संतांसी शरण रिघीजे भावें। १ ।
हेंचि भक्तिज्ञान वैराग्याचे निधि। विवेकेसी बुद्धि नांदे माजी। २ ॥
हे श्रवणाचें श्रवण मननाचें मनन। हेंचि निजध्यासन वैराग्याचें । ३ ।
म्हणोनि बैसलों संतांचे संगती। गोविंदा विश्रांति गहिनीनाथीं। ४ ।

३२७. बैसोनि एकांती गुरुगम्य गोष्टी। वेदांत परिपाठी शास्त्र बोध। १ ।
नित्य शुद्धबुद्ध निर्विकार पूर्ण। उमेसी जें ज्ञान शिव सांगें। २ ।
तेंचि सच्चिदानंद साकार जीव प्राण। शरीर जाय क्षीण जयापरी। ३ ।
तेंचि हें सर्व विठोबाचें नाम। निराईस प्रेम गहिनीनाथीं। ४ ।

३२८. बैसली दोघें भ्रतार वल्लभें। उदरीच्या गर्भे तेचि ध्यान। १ ।
भक्ति नवमास भरले पूर्ण दिवस। आलें वैराग्य डोळस मूर्तिमंत। २ ।
विठ्ठल आवडी ठेवियलें नाम। निराईस प्रेम गहिनीनाथीं। ३ ।

३२९. व्रतबंध दीक्षा उपदेश गायत्री। ॐकार मूळ मंत्री स्वर सोळा। १ ।
केलें वेदपठण काव्य आणि व्याकरण। झालासे निपुण शास्त्रवक्ता। २ ।

मग पुष्करादि तीर्थे पाहावी समस्ते। अनुताप चित्ते धरियेला। ३ ।
वैराग्य पुतळा ज्ञानगम्य मूर्ति। निघालासे भक्ति तीर्थाटणा। ४ ।
विठ्ठले वंदुनी मातापिता दोन्ही। मग तीर्थाटणी मुहुर्त केला। ५ ।

३३०. आला द्वारावती पाहिली कृष्णमूर्ति। जे मोक्ष विश्रांति मुमुक्षूंची। १ ।
धरी मच्छावतार केला शंखोद्धार। देव मुक्ति माहेर पांथिकांचें। २ ।
तेथून सत्वर आला पिंडारका। मंगळहडीहुनी द्वारका देखियेली। ३ ।
सुवर्णाची नगरी ब्राह्मणा दिधली। ते पुरी पाहिली सुदामयाची। ४ ।
मंडपाकार शोभे तो माधव। रुक्मिणी विवाह झाला जेथें। ५ ।
संपादुनी गेला अवतारकृत्य। तें भालुका तीर्थ देखियेले। ६ ।
पश्चिमे प्रभास लिंग देखियेलें। सोरटी वंदिले सोमनाथ। ७ ।
मुचकुंदादि गुंफा काळयवन उभा। विश्रांती पद्मनाभा धवलपुरी। ८ ।
मार्गींचीं तीर्थे करुनी समस्तें। आला शक्ति जेथें सप्तश्रृंगा। ९ ।
अरुणा वरुणा प्राची गोदावरी। ते कपाळेश्वरी पूजा केली। १०।
पुढें ज्योतिर्लिंग देखिलें त्र्यंबक। कुशावर्ती उदक स्वीकारिलें। ११।
वंदुनियां गंगाद्वार सव्य ब्रह्मगिरी। मग भीमाशंकरी आनंदला। १२।
देखोनिया भीमा आठवे पंढरी। विठ्ठला अंतरी पांडुरंग। १३।

३३१. ऐसा नित्यानित्य चालतां सुपंथी। पदोपदी कीर्ति नाम घोष। १ ।
आला अलंकापूरी इंद्रायणी तीरीं। स्नानसंध्या करी देवपूजा। २ ।
देखोनि सुब्राह्मण केलेंसे नमन। वंदिले चरण शिदोपंती। ३ ।
कोण तुमचा गांव आलेति कोठुनी। काय अभिधान गमन कोठें। ४ ।
विठ्ठलाचें नाम रामेश्वरी भाव। वृत्ति आपेगांव गोदातिरी। ५ ।
मातापिता वृद्धे वसताती तेथें। द्वारकादि तीर्थे करुनी आलों। ६ ।
आजि धन्य भाग्य स्वामीचें आगमन। आश्रम पावन कींजें माझा। ७ ।
आणुनी मंदिरी सारुनी भोजन। निद्रा करविली पूर्ण तया हाती। ८ ।

तंव स्वप्नावस्थेमाजी येउनि पंढरीनाथ । म्हणे कन्या सालंकृत द्यावी यासी । ९ ।
प्रात:काळ झाला नित्य नेम सारिला । मग नमस्कार केला शिदोपंती । १० ।
वंदोनियां चरणा सांगितलें स्वप्न । कन्या पाणिग्रहण कीजे तुम्ही । ११ ।
हांसोनि उत्तर बोलें पैं सारांशे । आज्ञा श्रीनिवासें केली नाहीं । १२ ।
आजिचा सुदीन स्वस्थ करुनी मन । वंदिले चरण शिदोपंती । १३ ।
ऐसे सुसंकल्प हेलावती मनीं । तुळसी वृंदावनी निद्रा केली । १४ ।
मग विश्वी विश्वंभर व्यापुनियां स्थानी । येऊनियां स्वप्नी काय बोलें । १५ ।
भक्ति आणि ज्ञान वैराग्य आवडी । वसती उघडी तुझ्या अंगी । १६ ।
मूर्तिमंत चारी जन्म इच्या उदरी । म्हणोनि स्वीकारी आज्ञा माझी । १७ ।
उठोनी विठ्ठले स्वप्न सांगितलें । हरुषे वंदिलें शिदोपंती । १८ ।
पाचारोनि जोशी घटितार्थ पाहिला । गुण उतरले छत्तीस ही । १९ ।
निर्धारिलें लग्न मिळाले ब्राह्मण । निर्विघ्न पूजन केलें आधीं । २० ।
देवकप्रतिष्ठा ब्राह्मण भोजन । घटिका झाली पूर्ण म्हणती द्विज । २१ ।
कुळदेवस्मरण म्हणती सावधान । उभयतांचे मन पांडुरंगी । २२ ।
झालें पाणिग्रहण विधीसी अर्पण । वंदिले चरण शिदोपंती । २३ ।
पांडुरंगक्षेत्रा मिळालीसे यात्रा । आले पंढरपुरा भक्तराज । २४ ।
गरुडटके पताका मृदंग वाजती । वैष्णव गर्जती जयजयकारें । २५ ।
गरुडपारीं उभें दाटी वैष्णवांची । उपमा वैकुंठीची पंढरीये । २६ ।
राउळाभीतरी प्रवेशली दोघें । देखियेले उभे पांडुरंग । २७ ।
कायावाचामनी पारुशले नयनी । मस्तक चरणीं ठेवियेला । २८ ।
विठ्ठलासी ध्यान रामकृष्ण माळा । हृदयी जिव्हाळा श्रीमूर्ति राया । २९ ।

३३२. आश्रमविधि करावें पालन । परी विठ्ठलाचें मन तीर्थाटणी । १ ।
जाणोनि अंतर म्हणे शिदोपंत । आपुले मनीचा हेत पुरता कीजें । २ ।
जावें हो सत्वर यावें स्वस्ति क्षेम । पावलें आश्रम शिदोपंत । ३ ।
विठ्ठले गमन केलें तीर्थाटणा । मुख्य मुख्य स्थाना अनुक्रमें । ४ ।

३३३. पाहिलें श्रीशैल्य निवृत्ती संगम । पापराशी भस्म देखतांचि। १ ।
चालतां सुपंथी हृदयी विठ्ठलमूर्ति। मुखीं नाम कीर्ति गात चाले। २ ।
अभोळ नरसिंह श्रीवासुदेव। सकळ देवराव व्यंकटाद्री। ३ ।
गेला अरुणाचळा करुनी नमन। चिदंबरा दक्षिण मथुरा कावेरी। ४ ।
वंदुनी जनार्दन गेला रामेश्वरा। हेत झाला पुरा विठ्ठलाचा । ५ ।

३३४. जानकी शुद्धी करावया गेला । हनुमंत उडाला जेथूनियां। १ ।
आनंद भरीत चालतसें मार्ग । हृदयी अनुराग आवडीचा। २ ।
तें स्थान वंदुनी पावला गोकर्ण। हाटकेश्वरीं स्नान करुनियां। ३ ।
आला कोल्हापुरी लक्ष्मी दरुषना। पंचगंगे स्नान करुनियां। ४ ।
प्रीतीचा संगम देखिलां कऱ्हाटकी। थोर झाला सुखी अंतरींच। ५ ।
कृष्णेचिया स्नाने कृतकृत्य झाला । माहुलीं देखिला संगम डोळा। ६ ।
आला अळंकावती हर्षयुक्त चित्ती। दिधलें शिदोपंती आलिंगन। ७ ।
विठ्ठल अंतरी मातापिता पाहावी। आज्ञा म्हणे द्यावी शिदोपंता। ८ ।

३३५. कुटुंबासहित जावें जी दर्शना। केलीसे प्रार्थना शिदोपंतीं। १ ।
सहज बोळवण संतांचे दर्शन। म्हणे केलें मान्य शीघ्र चला। २ ।
मग विठ्ठलानें मातापिता वंदिली। स्थिति सांगितली शिदोपंती। ३ ।
चिरंजीव नांदा म्हणती मातापिता। सुख आमुच्या चित्ता थोर झालें। ४ ।
वस्त्रे अलंकार शिदोपंता दिधले। मग गमन केलें शिदोपंती। ५ ।

३३६. असतां सुखरुप मातापिता वृद्ध। वैकुंठा स्वानंदें निघोनि गेलीं। १ ।
संसाराची चिंता नाही विठ्ठलासी। अखंड वृत्तीसी समाधान। २ ।
झालें वर्तमान ऐकिलें शिदोपंती। परम तेणें चित्ती खेद केला। ३ ।
येउनि परामर्ष घेतला दोघांचा। म्हणे सांभाळ तुमचा करितो देव। ४ ।
उदासीन वृत्ति तुमची सर्वकाळ। पदार्थ सकळ पाहिजे तो। ५ ।
दया करोनि मज आतां सांभाळावें। अळंकापुरी राहावें सुखरुप। ६ ।

पुत्रसंतती काहीं होईल तुम्हासी। मग येईल चित्तासी तें करा सुखें। ७ ।
मग मानुनी वचन विठ्ठले तयाचें। म्हणे हें देवाचें करणे हो। ८ ।

३३७. येउनि अळंकावती केला क्षेत्रवास। देउनी चित्तास समाधान। १ ।
नित्य हरिकथा नामसंकीर्तन। संतांचे दरूशन सर्वकाळ। २ ।
पंढरीची वारी आषाढी कार्तिकी। विठ्ठल एकाएकीं सुखरूप। ३ ।
ऐसा बहुत काळ क्रमिलियावरी। पुत्र अपत्य उदरीं होतां न दिसे। ४ ।
मग विठ्ठल म्हणे ऐकतेसी कांते। मज ऐसें वाटतें संन्यास घ्यावा। ५ ।
देसी आज्ञा तरी जाईन वाराणसी। ऐसें रखुमाईसी म्हणितलें। ६ ।

३३८. रखुमाई म्हणे ऐकतां जी ताता। संन्यास घ्यावा आतां म्हणताती। १ ।
संतती वांचुनी न घ्यावा संन्यास। ऐसें सांगा त्यांस म्हणितलें। २ ।
निरोपाची वाट पाहे भलत्या मिषें। रखुमाई असे सावधान। ३ ।
असतां दुश्चितपणें निरोप पुसिला। जा जा म्हणे दिधला अवसरू। ४ ।
जाउनि विठ्ठलें घेतला संन्यास। चिंता रखुमाईस पडली भारी। ५ ।

३३९. करावें सार्थक रखुमाईनें तेव्हां। आरंभिली सेवा अश्वत्थाची। १ ।
जाणोनि पैं देवें उग्र अनुष्ठान। तेथें झालें येणें श्रीपादाचें। २ ।
देखोनि सत्पात्र केला नमस्कार। सारांश उत्तर बोलियेलें। ३ ।
पुत्रवती होई दिधला आशिर्वाद। रखुमाईसी विनोद वाटियेला। ४ ।
माते तूं हांससी श्रीपाद पुसती। स्वामी पुत्र कैसे होती पतीवीण। ५ ।
भ्रतारें जाउनी घेतला संन्यास। स्वामीच्या वचनास नलगे बोल। ६ ।
पुसतां खाणखूण निश्चय बाणला। श्रीपाद बोलिला सत्य सत्य। ७ ।
रखुमाईसी पुसे असे तुझें कोणी। येरी कर जोडुनी बोलियेली। ८ ।

३४०. माता पिता घरीं आहेती समस्तें। वर्तमान तयातें श्रुत केलें। १ ।
कृपा करूनी यावें आश्रमासी। सनाथ करावयासी कृपादृष्टी। २ ।
नेउनि आश्रमा दिधलें आसन। केलें श्रुत वर्तमान शिदोपंतीं। ३ ।

अर्घ्यपाद्यपूजा भोजन सारिलें। माग वर्तमान पुसिलें शिदोपंतीं। ४।
श्रीपाद म्हणती रामेश्वरी भाव। तंव येथें हा अभिप्राव झाला ऐसा। ५।
आतां फिरोनियां जाणें वाराणसी। घेउनी रखुमाईसी तुम्हीं यावें। ६।

३४१. श्रीपाद म्हणती इच्या दोषास्तव। माझें पुण्य सर्व लया जातें। १।
शिदोपंत म्हणे तुम्ही दयावंत। शीघ्र गमनार्थ कीजे स्वामी। २।
जाउनी वाराणसी मठीं प्रवेशले। मग पाचारिलें चैतन्यासी। ३।
तुझे कोणी होते सत्य सांग आतां। अन्यथा बोलतां उरी नाहीं। ४।
चैतन्यें चरणीं ठेवियेला माथा। म्हणे त्यागुनी कांता आलों स्वामी। ५।
उठवुनी श्रीपादें दिधलें आश्वासन। म्हणती करीं पाणिग्रहण इचें आतां। ६।
अविधी कर्माचें न धरावें भय। यासी आहे साह्य जगदीश। ७।
स्वदेशी जाउनी करावा आश्रम। सुखरूप स्वधर्म चालवावा। ८।
श्रीपादें मस्तकीं हात ठेवियेला। निरोप दिधला चैतन्यासी। ९।

३४२. चैतन्याश्रम संन्यासी झाले गृहवासी। मुळीच्या प्रकृतीसी ऐक्य केलें। १।
हांसिन्नले लोक बरवा हा संन्यास। करिती उपहास दर्शनाचा। २।
द्विजीं वाळियेलें जगीं सांडियेलें। शेखीं उपेक्षिलें आप्तवर्गीं। ३।
ऐसीं बारा वर्षें क्रमिलीं निगुती। तंव झालीसे संतती चौघे जण। ४।
अधिक सत्याणव शके अकराशति। श्रावण मास तिथी कृष्णाष्टमी। ५।
वर्षा ऋतु युवानाम संवत्सर। उगवे निशाकर रात्रीमाजी। ६।
पंचमहापातकी तारावय जन। आले नारायण मृत्युलोकी। ७।
नामा म्हणे पूर्णब्रह्म ज्ञानेश्वर। घेतसे अवतार अलंकापुरी। ८।

३४३. निवृत्ती ज्ञानेश्वर सोपान मुक्ताई। हांसती सकळही ऐकुनि नांवें। १।
झालीं उपवर व्रतबंधा योग्य। उभयतां उद्वेग चिंतातुरें। २।
जाती कुळावेगळीं पडियेलीं निराळीं। माझी वंशावळी प्रायश्चित। ३।
मेळविले द्विज केली ब्रह्मसभा। क्षमा अपराधा करा दीना। ४।

संत ज्ञानदेवादिकांचे जन्म पुण्यक्षेत्र आळंदीत झाले.

निबंधीं निर्णय पाहती धर्मशास्त्रीं । तुम्ही अति श्रौती परायण । ५ ।
सांगाल तें मान्य म्हणती साहीजणें । शुची हे करणें पतितांसी । ६ ।
निवृत्ति म्हणे तुम्ही भूदेव प्रत्यक्ष। दर्शनेंची मोक्ष जडमूढा। ७ ।

३४४. पाहतील ग्रंथ सभाश्रेष्ठ महाजन । वैदिक शास्त्रज्ञ पुण्यश्लोक। १ ।
देहांत प्रायश्चित्त असे या बोलिलें। विचारूनि भलें हित करा। २ ।
म्हणती द्विजवर आणिक नाहीं उपाव। संस्कारें देह करा शुद्ध। ३ ।
श्रीपाद म्हणती अवश्य करीन । देह हे दंडीन अनुतापें । ४ ।
त्रिवेणी संगमीं घालीन कर्वती। गेला पूर्वस्थिती वीतरागें। ५ ।
दारा पुत्र गृह त्यजुनी निघाला । नमस्कार केला द्विजवृंदा। ६ ।
झड झडा जाती परतोनी न पाहती । नाहीं पुनरावृत्ति म्हणती द्विज । ७ ।
त्याग आणि वैराग्य हेंचि प्रायश्चित्त। मग झाला शुचिर्भूत गुरूकृपें । ८ ।
निवृत्ति म्हणती आम्हां कवण गती। सांगावें श्रीमंतीं विचारूनि। ९ ।

३४५. म्हणती सकळ द्विज जावें प्रतिष्ठाना । तेथुनी पत्र आणा तें वंद्य करूं। १ ।
नाहीं जाति कुळ वर्ण अधिकार । क्षेत्रीं वैश्य शूद्र द्विज नव्हों। २ ।
नव्हों देवगण यक्ष ना किन्नर । ऋषि निशाचर तेही नव्हों। ३ ।
ते आम्ही अविनाश अव्यक्त जुनाट। निजबोधें इष्ट स्वरूप माझें। ४ ।
नव्हे आप तेज वायु व्योम मही। महत्त्वत्व तेंही विराट नव्हे। ५ ।
नव्हें मी सगुण नव्हें मी निर्गुण । अनुभूतीं भजन होउनी नव्हें। ६ ।
निवृत्ति म्हणतसे ऐक ज्ञानेश्वरा । माझी परंपरा ऐसी आहे। ७ ।

३४६. विधि वेद विरूद्ध संपर्क संबंध। नाहीं भेदाभेद स्वस्वरूपीं। १ ।
अविधि आचरण परम दूषण । वेदोनारायण बोलियेला। २ ।
स्वधर्म अधिकार जाती परत्व भेद। उचित तें शुद्ध ज्याचें तया। ३ ।
म्हणोनियां संतीं अवश्य आचरावें । जना दाखवावें वर्तोनियां। ४ ।
कुळींचा कुळधर्म अवश्य पाळावा । सर्वथा न करावा अनाचार। ५ ।

प्रत्यवाय आहे अशास्त्रीं चालतां । पावन अवस्था जरी झाली। ६ ।
ज्ञानदेव म्हणे ऐकाजी निवृत्ति। बोलिली पद्धती धर्मशास्त्रीं। ७ ।

३४७. हेंचि आम्हां श्रेष्ठ बोलिले परमनिष्ठ। असतां दुर्घट परी सेव्य। १ ।
पांडवांचें कुळ शोधितां निर्मूळ । कुंड जार गोळ बुद्धिकासी। २ ।
भक्ति हे सरती जाती न सरती। ऐसी आत्मस्थिति स्वसंवेद्य। ३ ।
दुर्वास वसिष्ठ अगस्ति गौतम । हे ऋषि उत्तम कुळींचे कैसे । ४ ।
व्यास आणि वाल्मिकि कोण कुळ तयांचें । तैसेंचि आमुचें सोपान म्हणे। ५ ।

३४८. घेऊनियां पत्र निघाले सत्वर। करूनि नमस्कार सकळांसी। १ ।
जाउनी राहिले भोगावती तीरीं। तीर्थयात्रा विधिसंपादिली। २ ।
अनाथें पतीतें शरणागत दीनें। सनाथ करणें कृपादृष्टीं। ३ ।
केली ब्रह्मसभा बैसले वरिष्ठ। होतें तैसें स्पष्ट निवेदिलें। ४ ।
पत्र वांचूनियां सकळां झाले श्रुत। संन्याशाचे पुत्र कळों आलें। ५ ।
नाहीं प्रायश्चित्त उभयतां कुळभ्रष्ट। बोलियले श्रेष्ठ पूर्वापार। ६ ।
या एक उपाय असे शास्त्रमतें। अनन्य भक्तीतें अनुसरावें। ७ ।
तीव्र अनुतापें करावें भजन। गो खर आणि श्वान वंदुनियां। ८ ।
वंदावे अंत्यज ब्रह्मभावनेसी। ऐसें पद्धतीसी बोलियले। ९ ।
ऐकोनि निवृत्ति संतोषला चित्तीं। धन्य तुमची वदती तीर्थरूप। १०।
ज्ञानदेव म्हणे सांगाल तें मान्य। मुक्ताई सोपान आनंदलीं। ११।

३४९. ऐकोनि ऐसीं नांवें हासिन्नले ब्राह्मण। नामाचें अभिधान सांगा आम्हा। १ ।
एक म्हणती नामापाशीं काय आहे। ज्ञाना वाहत आहे पखालीसी। २ ।
ज्ञानदेव म्हणे तोही माझा आत्मा। वेगळीक आम्हां तया नाहीं। ३ ।
मारिती आसूड म्हैशियाचे पाठीं। तोंचि वळ उठी ज्ञानदेवा। ४ ।
म्हणती द्विजवर अहो ज्ञानदेवा। यापासोनी उच्चारावा वेदध्वनी। ५ ।
तरीच तुमची समता आम्हां येईल कळों। नाहीं तरी बोलों नका कांहीं। ६ ।

ज्ञानदेव म्हणे बोल रे ऋग्वेद । ओंकार मूळ शब्द प्रणवाचा । ७ ।
वेदाचा आरंभ करिता झाला पशू । विधि उपन्यासु सांग पढें । ८ ।
करिती आश्चर्य सकळ द्विजवर । हे तिन्ही अवतार तीन देवाचे । ९ ।
आदिमाया मुक्ताई मुक्तपणें अवतरली । आम्हांपासूनि झाली थोर चुकी । १० ।
कर्मठ अभिमानें ठकलों देहबुद्धि । गोंवियेलों विधि निषेधाच्या । ११ ।
नेणों भक्तिज्ञान वैराग्याचा लेश । कुटुंबाचे दास होउनि ठेलों । १२ ।
आणिकांसी सांगों आपण नाचरों । लटिकेंच हुंबरों प्रतिष्ठेसी । १३ ।
धन्य याचा वंश धन्य याचें कुळ । धन्य पुण्यशीळ अवतार हे । १४ ।
सकळ द्विजवर करिती नमस्कार । आनंदें जयजयकार करिताती । १५ ।
ज्ञानदेव म्हणे तुमच्या चरणांचा महिमा । सामर्थ्य हें आम्हां अंगीं नाहीं । १६ ।
तुम्ही वेदरूप भूदेव प्रत्यक्ष । तुमच्या दर्शनेंचि मोक्ष जडमूढां । १७ ।
सकळही तीर्थे तुमच्या वसतील पायीं । तेथें आमुचे कायी उरती दोष । १८ ।
धन्य दिवस आजी झालों कृतकृत्य । भेटलेती संत ब्रह्म वृंद आम्हां । १९ ।
ज्ञानदेवा ध्यान ब्राह्मणाचे चरण । कलीमल छेदन निवृत्ति म्हणे । २० ।

३५०. जयाचें दर्शन होतांची दुरुनी । सर्व जाय पळोनी पापताप । १ ।
तीर्थांसी पावन कलिमल छेदन । देवाचें कल्याण जयाचेनी । २ ।
ते पाय सादृश्य देखिले आजि दृष्टी । याग सहस्र कोटी न तुकती । ३ ।
जयाच्या हृदयीं वेदाचा निवास । शास्त्रें रहिवास केला होय । ४ ।
जयांच्या वचनें देवपितर तृप्त । स्वाहा स्वधा होत ज्यांच्या मुखे । ५ ।
जोडूनियां कर विनवितो सोपान । निश्चयेंसी वचन द्यावें आम्हां । ६ ।
शेष उच्छिष्टा करावें विभागी । बटुपणालागीं अधिकारी । ७ ।
अध्यात्म ग्रंथ पाहती पैठणीं । गीता संबोधनी जवळी असे । ८ ।
भोगावती स्नान कालिका दरुशन । वेदांत व्याख्यान परिमिती । ९ ।
धन्य हा सोपान धन्य ज्ञानदेव । धन्य निवृत्तिराव ब्रह्मरूप । १० ।

सांगती पुराण रात्रीं हरिकीर्तन । पैठणींचे जन वेधियेले। ११ ।
तंव कव्ययज्ञ झाला गृहस्थाचे घरीं। पितर मंत्रोच्चारीं आव्हानिलें। १२ ।
अवघे द्विजवर म्हणती धन्य धन्य। यासारिखे ब्राह्मण नाहीं कोणी। १३ ।
उपनिषद्धाग पढिलों वेदांत । परि हें सामर्थ्य नाहीं आम्हां। १४ ।
नाहीं आइकिलें ना कोठें वर्तलें सृष्टी । तेचि आजी दृष्टी दाखविले। १५ ।
पशुमुखें वेद दृश्य पितरलोक। थोर हें कवतुक दाखविलें । १६ ।
मिळोनि समस्त सोडियेलीं शास्त्रें। विचारोनि पत्र लिहियेलें। १७ ।
हे परलोकींचे तारू देवत्रययासी । प्रायश्चित काय यासी द्यावें कोणी । १८ ।
लिहोनियां पत्र दिधलें तया हातीं । समस्तांसी निवृत्ति नमस्कारिलें । १९ ।

३५१. घेऊनियां पत्र केली प्रदक्षणा । साष्टांगीं ब्राह्मणां नमन केलें । १ ।
मागोनियां म्हैशा नेवाशासी आले । प्राकृत पैं केली गीता देवी। २ ।
निवृत्ति म्हणती ऐक ज्ञानदेवा। अनुभव करावा अमृताऐसा। ३ ।
क्रमिताती मार्ग अनुभव कुशल । हरि नाम सकळ कवित्वकळा । ४ ।
आदि शक्ति माता वंदुनियां म्हाळसा । मग तेथुनी सरिसा चालियेले। ५ ।
येउनी उतरली आळाचिये वनीं। पशु तये स्थानीं शांत झाला । ६ ।
करुनी तया पूजन सेंदूर तेलें लेपून। आळंकावती निजस्थान प्रवेशलीं । ७ ।
सान थोर सकळ तेथील निवासी। निवृत्तिं तयांसी नमस्कारिलें । ८ ।

३५२. तिन्ही देव जैसे परब्रह्मींचे ठसे। जगीं सूर्य जैसे प्रकाशले। १ ।
धन्य तो निवृत्ति धन्य तो सोपान। धन्य हा निधान ज्ञानदेव। २ ।
उपजतांचि ज्ञानी हें वर्म जाणोनी। आले लोटांगणीं चांगदेव। ३ ।
प्रत्यक्ष पैठणीं भटीं केला वाद । बोलविला वेद म्हैसीपुत्रा। ४ ।
संस्कृताच्या सोडोनियां गांठी। केलीसे मराठी गीता देवी। ५ ।
नामा म्हणे सर्व सुकृते लाहिजे। एक वेळां जाइजे अळंकावती। ६ ।

## संत ज्ञानदेव समाधिमहिमा

३५३. ज्ञानदेव म्हणे विठ्ठलासी। समाधान तूंचि होसी।
परि समाधि हे तुजपाशीं। घेईन देवा। १।
नलगे मज भुक्ति। नलगे मज मुक्ति।
तुझ्या चरणीं आर्ती। थोर आथी। २।
विठोजी म्हणे ज्ञानदेवा। ज्ञानसागरा स्वानुभवा।
वचनेचि विसांवा। झाला मज। ३।
ऐकें ज्ञान चक्रवर्ती। तूं तंव ज्ञानाचीच मूर्ती।
परि पुससी जे आर्ती। ते कळली मज। ४।
एक एक अनुभव कृपा। पद पदांतरें केला सोपा।
तरी यांत माझिया कृपा। सकळही वोळली। ५।
ज्ञानदेवे चरणीं मिठी। मनेंसी पडली एके गांठी।
दृश्यादृश्य झाली एक दृष्टी। प्रत्यक्ष भेटविलेंसी। ६।
कर ठेवुनी कुरवाळी। सर्वांग न्याहारुनी न्याहाळी।
म्हणे तुवां घेतली जे आळी। ते सिद्धीतें पावेल। ७।
नामा उभा असे सन्मुख। ऐकतां थोर खेद दुःख।
म्हणे ज्ञानांजन महासुख। समाधि घेतसे। ८।

३५४. ज्ञानदेव उभा जोडोनि हस्त। भक्त पाहती समस्त।
विठोजी म्हणे कळला स्वार्थ। या ज्ञानांजनाचा। १।
कैसें ओळलें त्या ज्ञाना। समाधान तया ध्याना।
मन नाठवे मी तूंपणा। समाधिखुणा ज्ञानासी। २।
मग म्हणे विठोजी दातार। समाधि तुज निरंतर।
आतां प्रस्थान करीं साचार। मज निरंतर आठवीं। ३।
कैसे परिपूर्ण वोळले। आपण समाधिरूप झाले।
मनातें मन समरसलें। विठ्ठल स्वरूपीं। ४।

दशमी प्रस्थानाचा समयो। एकादशी जागर उत्सावो।
द्वादशी क्षीरापती महोत्सावो। ज्ञानदेवें केला। ५ ।
त्रयोदशी म्हणे पांडुरंग। कांहीं न करि गा उद्वेग।
अलंकापुरीं समाधि प्रसंग। करीं करीं लवलाही। ६ ।
माता रुक्मिणी वाढी ताटीं। विठोजी म्हणे उघडी दृष्टी।
तुज मज आहे नित्य भेटी। येईं पंढरीये। ७ ।
नामा म्हणे ज्ञान उदयो। अलंकापुरीं सिद्ध समयो।
परी विठ्ठलीं मुराला भावो। या ज्ञानदेवाचा। ८ ।

३५५. विठोजी म्हणे ज्ञानदेवा। तुझी विश्रांति मज ठेवा।
ते मुराली आमुचिया भावा। नि:संदेहें । १ ।
कैसें समाधान ज्ञानदेवा। अलंकापुरीं समाधि ठेवा।
विठ्ठल ओळला वोल्हावा। नित्यरूप समाधि। २ ।
संत करिती महा खेद। म्हणती ज्ञानांजन उद्‌बोध।
मग चालिले विद्‌गद। अलंकापुरीं । ३ ।
महावल्ली वृक्ष अजान। तो निक्षेपिला पूर्णघन।
मग विठोजी म्हणे आपण। ज्ञानदेवासी । ४ ।
धन्य धन्य ज्ञानेश्वरा। पुण्यभूमि समाधि स्थिरा।
कृष्णपक्षी तुज निर्धारा। भेट देत जाईन। ५ ।
कार्तिक मासीं शुद्ध एकादशी। पंढरीयात्रा होईल सरिशी।
दुजी कृष्णपक्षीं निर्धारिंसी। तुज दिधली असे। ६ ।
हें ऐकोनि संतजनीं। जयजयकार केला ध्वनी।
दिंडी पताका मेळ गगनीं। देव सुमनें वर्षताती। ७ ।
नामा म्हणे आले वैष्णव। अलंकापुरीं मिळाले सर्व।
समाधिसुखी ज्ञानदेव। बैसते जाहले। ८ ।

३५६. महा उत्साव त्रयोदशीं । केला त्या ज्ञानदेवासी।
मग नामा म्हणे विठोबासी। चरण धरूनियां। १ ।
समाधिसुख दिधलें देवा। ज्ञानांजन अलंकापुरी ठेवा।
अजानवृक्षीं बीज वोल्हावा। या ज्ञानांजनासी। २ ।
कृपा आली विठ्ठलासी। म्हणे ज्ञानदेवा परियेसी।
तीर्थ भागीरथी अहर्निशीं। तुज नित्य स्नानासी दिधली। ३ ।
इंद्रायणी दक्षिण वाहिनी। भागीरथी मणिकर्णिका दोन्ही।
इया मिळालिया त्रिसंगमीं। पुण्यभूमि तुझिये। ४ ।
येथें जरी नित्य स्नान घडे। तरी नित्य वैकुंठवास जोडे।
तुज नाहीं नाहीं कुवाडे। मी वाडे कोडे उभा असें। ५ ।
येथे हरिकथा नाम वाचे। जो उच्चारील विठ्ठलाचें।
तयासी पेणें वैकुंठीचें। दिधले साचें अक्षयीं। ६ ।
आणिक ऐकें रे ज्ञानराजा। जो या सिद्धेश्वरीं करी पूजा।
तो अंतरंग सखा माझा। मुक्ती सहजा जाहली त्यासी। ७ ।
नामा म्हणे ऐसें अंतरंग। कैसा ओळला पांडुरंग।
ज्ञानदेवीं समाधि सांग। हरिपाठ कीर्तनें। ८ ।

३५७. सनकादिकीं मंत्रघोष। केले विधिपूर्वक पांच दिवस।
मग पांडुरंग यथावकाश। भक्ता वास महिवरी। १ ।
धन्यभूमि अलंकापुरी। ज्ञान समाधि खेचरी।
पूर्ण परिपूर्ण श्रीहरी। स्वये आपण उभा असे। २ ।
संत भागवत देव्हडे। अमर उभे चहूकडे।
नारद तुंबर पुढें। वीणा वाजविती। ३ ।
एकीं केला जयजयकार। ज्ञानदेवीं धरूनियां कर।
विठ्ठलचरणासमोर। निकट बैसते जाहले। ४ ।

करें कुरवाळिलें ज्ञाना। कांसवी अवलोकिला पान्हा।
आंसुवें येताती नयना। तया ज्ञानदेवाचिया। ५।
विठोजी म्हणे ज्ञानांजना। तुझेनि कवित्वें हरे दारूणा।
उच्चारितां महा विघ्ना। सकळै पळती। ६।
तुज आठवील जो भक्त। तो होईल विरक्त।
ऐसें विठोजी बोलत। येरू चरणीं रुळे। ७।
नामा म्हणे सकळ तीर्थराजा। तया कृपा कैसी केली सहजा।
एकादशी दिधली पूजा। तया ज्ञानदेवासी। ८।

३५८. स्नानविधि केलिया भक्तीं। नाममंत्राचिया आवृत्ती।
मग प्रत्यक्ष पूजिली मूर्ती। विठोबाची। १।
धन्य धन्य तो देव ज्ञान। राजा निवृत्ति निधान।
विठोजी आपण। भक्तां साह्य। २।
मग सकळहि भक्तमेळीं। सहीत वनमाळी।
बैसले तयापाळीं। इंद्रायणीचे। ३।
एकीं केलें स्तुतिस्त्रोत्र। एक जपताती नाममंत्र।
एक गाताती वेदस्तोत्रे। विठोबासी। ४।
तंव पुढारा झाला नारा। तो नामयाचा पुत्र सैरा।
तो पुसतसे विचारा। नामयासी। ५।
ये संतसभेमाजी। राऊळ बैसले असे सहजीं।
यातें पुसे जो कां जी। कवण क्षेत्र म्हणोनि। ६।
उठिला नामा प्रेमें डुले। वंदिलीं विठ्ठलपाउलें।
मग करद्वय जोडुनी बोले। साशंकित। ७।
नामा म्हणे पूर्ण ब्रह्म। तें कैसें सभासदी मन।
तें बोलतसे परम। ज्ञानदेवा भाग्यें। ८।

३५९. मग सकळ प्रेमपुतळे । बैसले माजी ब्रह्ममेळे ।
तेथें नामा वचन बोले । स्वामीप्रति । १ ।
वोळलें चैतन्य सतरावें । पूर्ण नाम ओघ विठ्ठलदेवें ।
पव्हे घालुनी ज्ञानदेवें । जग तारिलें कीर्तनें । २ ।
नामा म्हणे स्वामी सर्वज्ञ । परि आमुचें मन निमग्न ।
चरणरजें पापभग्न । पवित्र जालें । ३ ।
तरी स्वामिराजा विनंती । परियेसी गा माझी पुढती ।
अलंकापुरीं होती । कवणिये युगीं । ४ ।
हें सांगिजे जी समर्था । कवण क्षेत्र कवण तीर्था ।
येथें क्षेत्रज्ञ हा सर्वथा । कवण धर्म असे । ५ ।
तूं आत्माराम संपन्न । जुगा जुनाट नारायण ।
तुजप्रति हें वचन । न साहे माझें । ६ ।
कांसवीचा तूं सार गाढा । तैसा तुझा पवाडा ।
हें पुसणें कवणिया चाडा । तें तूंचि जाणसी । ७ ।
नामा उभा तिष्ठत प्रेमें । संत दाटले सप्रेमें ।
आपण तें तें अनुक्रमें । सांगतसे देव । ८ ।

३६०. देवासी कळलें गौप्यगुज । म्हणे रे नामया हेंचि चोज ।
तो निजभाव सहज । प्रगट सांगू आतां । १ ।
कृतायुगीं क्षेत्र आदि । ज्ञानदेवा तेथें समाधी ।
देव सांगतसे शुद्धी । योगबुद्धी जुनाट । २ ।
ऐके भक्तजन श्रेष्ठ । भूमिनामें वैकुंठपीठ ।
तें हें अलंकापुरीं श्रेष्ठ । आदि वरिष्ठ पीठा आठरा । ३ ।
आणिक ऐक रे वचन । हें पंचक्रोशी पुरातन ।
यासी युगें सांगतां संपन्न । चतुरानन जाणतसे । ४ ।

कांहीं एक किंचित सांगो। युगसंख्या मार्गांत रिघो।
तरी वैवस्वत हाचि मागो। पूर्ण वोळंगो या पासोनी। ५ ।
मनु सहस्र युगें संख्या। तैं अलंकापुरीं आदि लक्ष्या।
कोटी याग असंख्या। सहस्र दक्ष येथें झाले। ६ ।
आदि क्षेत्रसंख्यारहित। ऋषिमुनी तपती सत्य।
आणि नारदमुनि असें सांगत। हेचि पुरी पुरातन। ७ ।।
नामा म्हणे कैसें दिधलें। हें ज्ञानासी सिद्ध लाधलें।
तेंचि आम्हासी जोडलें। पूर्ण लाधलें पियूष। ८ ।

३६१. देव म्हणे नामया। ऐकें येथें चित्त देऊनिया।
एक एक तीर्थ सांगावया। हें तों पुराणीं असे। १ ।
नकळे देवाची थोरी। कैसे पुढारिले मुरारी।
गौप्यगुज श्रीहरी। सांगतसे नामया। २ ।
पुराणीं म्हणसी कोण कथा। तरी ऐकें गा तूं सकळार्था।
शैवशास्त्र हा ग्रंथ सर्वथा। सिद्ध मार्ग असे। ३ ।
जें जें जुनाट क्षेत्रतीर्थ। जें जें ब्रह्मनामें परमार्थ।
तो तो सांगितला हेत। चतुराननें । ४ ।
ऐसें देवमुखींचें वचन। ऐकतां संतोषले पूर्ण।
मग देताती आलिंगन। एकमेकांसी । ५ ।
जयजयकाराची ध्वनी। विठ्ठलनामें गर्जे वाणी।
प्रेम वोसंडत नयनीं। स्फुंदन रोमांचित दाटले। ६ ।
स्फुंदत नामा नाचे गाये। परिसा म्हणे वोळली माये।
तो ज्ञानासी पान्हा होये। पूर्ण बोधाचा। ७ ।
नामा म्हणे सकळ संतमेळीं। कथा सांगितली रसाळी।
तंव ज्ञानदेवा करतलामळीं। समाधि शेज घातली। ८ ।

३६२. मग म्हणे सर्वज्ञ विठ्ठल। न लावावा वाढवेळ।
मग पातले निर्मळ। सिद्धेश्वरलिंगी ।१।
धन्य धन्य हरि दिवस। धन्य धन्य हा निवास।
आपण हृषिकेश। भक्ता साहे।२।
वैष्णव मिळाले संपन्न। गाती हरिनाम कीर्तन।
तंव पातले सोपान। प्रेमें वोसंडत।३।
चरणीं घातली मिठी। विठोजी म्हणे उठी उठी।
लवलाहे उघडी दृष्टी। भेट ज्ञानदेवासी।४।
येरु म्हणे मी कृतकृत्य। नामस्मरण तुझें नित्य।
तेणें सकळ हित। आमुचें झालें।५।
तूं चि गा जनक जननी। तूंचि एक त्रिभुवनीं।
पाहातां नित्य उन्मनी। लागे आम्हां।६।
समाधि शेज ज्ञानेसी। घातली अहर्निशीं।
ते कर्णी परिसत जिवेंसी। तुवा चरण धरित आलों।७।
नामा म्हणे ज्ञान सोपान। एक झाले जनीं जनार्दन।
समाधि सांगे संजीवन। अलंकापुरीं आले।८।

संत नामदेवांना शैवशास्त्र ग्रंथ ज्ञात होता.

३६३. तंव निवृत्तिसी उन्मनी। बैसका होती सप्तदिनीं।
ते पालटोनी तत्क्षणीं। मूर्ति ते न्याहाळी।१।
निवृत्ति निधान। सोपान निजधन।
ज्ञानदेव आपण। तिन्ही मूर्ति।२।
कोण भाग्याचे संतुष्ट। जेथें प्रगटलें वैकुंठ।
विठ्ठलनामें पूर्ण पाठ। अलंकापुरीसी ।३।
आदिक्षेत्र जुनाट। युगें सांगतां उद्भट।
जें कां पुण्यरूप प्रगट। सांगतसे महिमा।४।

ऐसा उत्साह गमला। निवृत्ति ध्यानीं निवाला।
तंव सोपान आलिंगला। ज्ञानराजें ।५।
निवृत्ति पाहे ज्ञानाकडे। येरु धांवे लवडसवडे।
तंव चरणरजामाजी बुडे। मन निमग्न केलें।६।
तिन्ही देव एकत्र। सत्व रजतमादि मंत्र।
हें गाताती नर जे स्तोत्र। ते उद्धरती सर्वदा।७।
नामा म्हणे तिन्ही देव। मिळाले सांग वैभव।
समाधि सेज माधव। देतु असे ज्ञानदेवा।८।

३६४. हस्त ठेविला माथया। ज्ञानदेव लागे पायां।
विठोजी म्हणे लवलाह्या। समाधीस बैसावें।१।
इंद्र चंद्र देव येती। ब्रह्मादिक गीती गाती।
यम वरुण बृहस्पती। विमानें दाटती अंतरिक्षीं।२।
तंव पातले गरुडदेव। रुक्मिणी सत्यभामा भाव।
राही माता गोपी सर्व। समाधि ज्ञानदेव पाहावया।३।
ब्रह्मा इंद्र प्रजापती। सर्व अंतरिक्षीं पाहाती।
अलंकापुरीं ये श्रीपती। हरुष चित्तीं ज्ञानदेवा।४।
ऋषिमुनि गणगंधर्व। पिशाच गुह्यक सर्व।
ध्रुव अंबऋषि माधव। चित्तीं भाव पाहावया।५।
ऐसीं दाटलीं विमानें। संत जाणितले ज्ञानें।
ज्ञानदेव ब्रह्म होणें। हें विंदान विठ्ठलाचें।६।
जयजय शब्दें ध्वनि गर्जे। तेणें स्वर्ग मृत्यु पाताळ गाजे।
पाताळीं शेष म्हणे भुंजे। प्रेमें फुंजे न समाये।७।
नामा म्हणे शिवादिक। सिद्धेश्वरीं मिळाली सकळीक।
पाहाती विठ्ठल कौतुक। ज्ञानदेवसमाधीचें ।८।

३६५. वेदध्वनि केलिया मुनी। गंधर्व गायनें होती गगनीं।
ब्रह्मादिक इंद्र विमानीं। इंद्रायणी ज्ञानदेवीं। १।
लागलिया मंगळतुरे ध्वनी। तीर्थें असती उभीं कर जोडुनी।
विठ्ठलदेव ज्ञानसंजीवनी। नयनीं न्याहाळिती। २।
राही रखुमाई माता। सत्यभामा गोपी समस्ता।
आरतिया ओवाळती निभ्रांता। ब्रह्मत्वरिता ज्ञानदेवा। ३।
देवऋषिगण सकळ। जयजयकार ध्वनि मंजुळ।
स्तुतिस्तोत्रें सकळ। नक्षत्रादि गाती। ४।
वरुषती दिव्य सुमनें। निवृत्ति सोपान नारायणें।
संबोखिले संजीवनें। नित्य पारणें हरिपाठें। ५।
परिसा भागवत डुल्लत। विठ्ठली झाला कृतकृत्य।
नामा असे शोकाकुलित। चरणीं रत विठ्ठलाच्या। ६।
शेज घालुनी सुमनीं। विठ्ठल पाहे रुक्मिणी।
ज्ञानदेवाचे गुण मनीं। आठवती म्हणे हरी। ७।
नामा झाला भयभीत चित्तें। ज्ञानासारखें रत्न मागुतें।
न देखों ऐसें विठ्ठलातें। पुसे त्वरित रुक्मिणी। ८।

३६६. देव म्हणती रुक्मिणी। हा एकचि योगी देखिला नयनीं।
हेंचि ज्ञान संजीवनी। जाण त्रैलोक्यासी। १।
धन्यधन्य धरातळीं। जो यातें दृष्टीं न्याहाळी।
तो वाहात येईल टाळी। वैकुंठ भुवनासी। २।
जो करील याची यात्रा। तो तारील सकळ गोत्रां।
सकळही कुळें पवित्रा। याचेनि दर्शनें होतीं। ३।
अलंकापुरीं हें शिवपीठ। पूर्वीं येथें होते नीळकंठ।
ब्रह्मादिकीं तप वरिष्ठ। येथेंचि पैं केलें। ४।

इंद्र येऊनियां भूमीसी । याग संपादिले अहर्निशीं।
इंद्रायणी इंदोरिसीं । पंचक्रोशी यापासूनि । ५ ।
येथें त्रिवेणी गुप्त असे । भैरवापासोनि भागीरथी वसे।
पूर्ववटि जे माया दिसे । ते प्रत्यक्ष जाणा पार्वती। ६ ।
भोंवतीं वनवल्ली वृक्ष । येथें देव येऊनि होती पक्ष।
हे असे नित्य साक्ष । अस्थी नासती उदकीं । ७ ।
पंढरीहुनि हें सोपें । जनाचीं हरावया पापें ।
कळिकाळ कोपलिया कोपें । त्याचे न चले अलंकापुरीसी। ८ ।
ऐसें सांगतां हरिसी। प्रेम ओसंडलें रुक्मिणीसी ।
म्हणे धन्य धन्य जयाचे कुसीं । ज्ञानदेव जन्मले । ९ ।
नामा म्हणे माझा स्वामी । सवें संतसमागमीं।
ऐसें सांगितलें ग्रामी। अलंकापुरीसी ।१०।

३६७. तंव पुसती होय माता । तुम्ही झणें खेद करा चित्ता।
तरी ज्ञानासारिखा कां आतां । समाधीसी बैसवितां । १ ।
हें सांगावें सविस्तर । याचे कोण कोण अवतार ।
बंधु त्रिवर्ग हे साचार । आणि ते भगिनी। २ ।
देव म्हणती ब्रह्मा होय । सोपानदेव नेणसी काय ।
निवृत्ति शिव ज्योतिर्मय । ज्ञानदेव ब्रह्मनिघोट। ३ ।
ऐसे ब्रह्मा विष्णु हर । मुक्ताई ते मूळमाया साचार।
तारावया चराचर । कलिमाजी अवतरले। ४ ।
रुक्मिणी पुसे देवासी । कां कलिमाजी जन दोषी।
हे घातली देवा पुसी। ते सांगती महाविष्णु। ५ ।
तरी ऐकें हो साचार चित्तें। तूं काय नेणसी त्या व्यासातें।
ग्रंथीं सांगितलें भारतें। कलिमाजी जन दोषी । ६ ।

कृष्ण अवतार झाला। पांडवीं निजठाव ठाकिला।
तेथून एक शक झाला। जन्मेजयापासुनी ।७।
तया मागें विक्रमशक। पुण्य पवित्र सकळ लोक।
कलियुगीं पुण्यश्लोक। उज्जनिये नांदती ।८।
तेणें एकशत पंचतीस। हरिले कळिकाळ दोष।
पुढें शालिवाहन व्हावयास। अवतार जाण पैठणीं।९।
तो हा शालीवाहन। अठराहजार जाण।
तें क्षेत्र प्रतिष्ठान। गंगातीरीं प्रत्यक्ष।१०।
या शकामाजी प्रथम। राजा भोज उत्तम।
मग पुण्यपुरुष जन्म। थोडे घेती कलियुगीं।११।
राजे भ्रष्ट यवन झाले। ठायीं ठायीं दोष जडले।
मग इहीं अवतार घेतले। कलि दोष हरावया।१२।
रुक्मिणी म्हणे स्वामी। सत्य सांगितलें तुम्हीं।
पुराण प्रसिद्ध आम्ही। अवतार चरित्रें जाणतसों।१३।
नामा म्हणे पुढें हे जन। यवन संसर्गें कठीण।
होतां गाती हरिचे गुण। ते उद्धरती सर्वथा।१४।

३६८. पुष्पक विमानतळीं। हरि उतरले भूतळीं।
तंव उदयो पूर्वमेळीं। सूर्याचा जाहला।१।
धन्यधन्य प्रश्नोत्तर। धन्यधन्य ते तरुवर।
धन्य ज्ञानदेव अवतार। तिन्ही देव प्रगटले।२।
संत सनकादिक देव। आणि भक्त आले सर्व।
स्नानें करूनियां भाव। हरिचरणीं ठेविला।३।
विलाप मांडिला भक्तीं। खंति करिती त्रिजगतीं।
ज्ञानदेवासारिखी मूर्ती। न देखों म्हणती देवराया।४।

देव म्हणती निवृत्ति। तूं प्रत्यक्ष शिवमूर्ति।
तारावया क्षिती। अवतार धरिला। ५।
सोपानें घातलें लोटांगण। मुक्ताईने धरिले चरण।
संत करिताती स्तवन। पांडुरंग रायाचें। ६।
मग संबोखोनियां हरी। सोपान देवो धरिला करीं।
निवृत्ति मस्तकावरी। करकमळ ठेवितसे। ७।
नारा विठा पुढें चाले। ऐसे इंद्रायणीस आले।
सौंदडी वृक्षातळीं बैंसले। सहपरिवारें सकळही भक्त। ८।
न्याहाळिती कांसव दृष्टी। ऐसा हरि चालत सृष्टीं।
नामा होतसे हिंपुटी। ज्ञानदेवाकारणें। ९।

३६९. तंव अंतरिक्ष गगनीं। अवचित झाली वाणी।
भक्त तरतील ये मेदिनीं। ज्ञानदेव दर्शनें। १।
धन्य धन्य वृक्ष अजान। धन्य धन्य सिद्धेश्वरस्थान।
ज्ञानदेवा समाधान। धन्य अलंकापुरीं। २।
ऐंसी खवाणी वदली। जयजयकारें टाळी पिटिली।
तंव स्नानसंध्या सारिली। देवभक्तीं सकळिकीं। ३।
मग पाहोनियां शुभदिन। देवें आदरिलें प्रयाण।
नामा होतसे खेद क्षीण। ज्ञानदेवाकारणें। ४।

३७०. मग प्रश्न आदरिला। नामा स्फुंदों जो लागला।
कां गा ज्ञानदेवो गेला। मज सांडूनियां। १।
कैसा होय तुझा दास। कैसी पाहो तुझी वास।
ज्ञानाकारणें कासावीस। जीव माझा होतसे। २।
देव म्हणे नामयासी। झणी कासावीस होसी।
तू रे तयातें नेणसी। तें कैसें आईक पां। ३।

ज्ञानदेव ज्ञानसागरू । ज्ञानदेव ज्ञानागरू।
ज्ञानदेव भवसिंधु तारू । प्रत्यक्ष रूपें पैं असे। ४ ।
ज्ञानदेव ज्ञानगम्य । ज्ञानदेव ज्ञानधर्म्य ।
ज्ञानदेव ज्ञाननेम। सर्वथैव पैं असे । ५ ।
ज्ञानदेव हाचि देव । ज्ञानदेवीं धरलिया भाव ।
ज्ञान होईल जीवां सर्व । यासी संदेह नाहीं। ६ ।
ज्ञानदेवी धरितां ध्यान। ध्यातां होय समाधान ।
जीव शिवीं परिपूर्ण। एके रात्रीं कीर्तन केलिया। ७ ।
म्हणे तूं व्याकुळ होसी चित्तें। मनी आठवीं गा मातें।
नामस्मरणें एकाग्र चित्तें । रामकृष्ण गोविंद । ८ ।
नामा म्हणे तूं समर्थ होसी । अर्जुना प्रीति करिसी।
हें सांगितलें व्यासी । एकादशाध्यायीं । ९ ।
तैसा पावे तूं विश्वेशा। विश्वरूपा जगन्निवासा ।
मी होतसें कासावीसा। ज्ञानदेवाकारणें ।१०।
तरी तूं गा युगानयुगीं। असशी भक्तांचिया संगीं।
आम्ही विनटलों पांडुरंगीं । रंगारंगी विठ्ठलीं ।११।
एक वेळा माझा शोक । दुरी जाय हरे विख ।
ते करी निर्विशेष । नामा येतसे काकुळती ।१२।

३७१. तंव नावेक श्रीहरी । तटस्थ घटिका चारी ।
ध्यान धरूनी अंतरीं। निश्चळ राहिला। १ ।
जय शब्दें नामा बोभाये । केशवा त्राहें त्राहें।
मी व्याकुळ होत आहें । ज्ञानदेवाकारणें । २ ।
नारायणा त्राहें त्राहें । कृपादृष्टि तूं रे पाहे।
मी व्याकुळ होत आहें । ज्ञानदेवा कारणें। ३ ।

तुझेनि दर्शनें। ज्ञानाचेनि अवलोकनें।
मज पंढरी असणें। तुझे चरणीं गा विठ्ठला। ४।
आतां मज तूं सांभाळी। ज्ञानदेवावीण सदाकाळीं।
मज न कंठे भू मंडळीं। भानुसहित वर्ततां। ५।
तूं माझी जनक जननी। परी ज्ञानदेवावीण मेदिनी।
शून्य वाटे मजलागुनी। जैसे मत्स जीवनेवीण। ६।
तूं रक्षिता सर्व जीवांसी। तरी कां दुःख दिधलें आम्हांसी।
तूं जवळी असतां हृषिकेशी। ऐसी दशा हे प्राप्त। ७।
नामा खेद क्षीण झाला जीवें। तंव नेत्र उघडिले देवें।
आलिंगिला केशवें। चारी भुजा पसरूनी। ८।

३७२. नामा न राहे खेद करूं। केशव ठेवी अभयकरू।
म्हणे तूं दुःखिया होसी थोरू। ज्ञानदेवा कारणें। १।
धन्यधन्य तुम्ही भक्त। नित्य विष्णुचरणीं रत।
पुण्यशीळ भाग्यवंत। ज्ञानदेव नामया। २।
तुमचेनि जन हे कृतार्थ। कवित्वें तरेल हें सत्य।
माया मोहें निरसे सत्य। नामस्मरणें तुमचेनी। ३।
धन्य ज्ञानदेव ज्ञानशिळ। ज्ञानदेवा ऐसा सुढाळ।
मी न देखें भूमंडळ। सकळही पाहतां। ४।
तूं करिसी खेद त्याचा। तरी तो आत्मा माझा साचा।
भाव सांडीं सांडीं द्वैताचा। निखळरूपें पाहें पां। ५।
तुम्ही भक्त अवघे आवडते। तुमचेनि साजिरे पुर्णचित्तें।
मज पंढरीस येणें आवडतें। नाम गाताति ये प्रीती। ६।
पुंडलिक माझा भक्तसखा। परी प्रेमळ तुम्ही विशेषा।
तुमचेनि सर्व दुःखा। हरणें मी हें जाणावें। ७।

नामा म्हणे ज्ञानदेवाचें। मज दर्शन होईल साचें।
तरीच रंगणीं मी नाचें। श्रीहरिकीर्तनीं पंढरीये। ८।

३७३. ऐसें परिसले विठ्ठलें। तंव रूक्मिणीनें विनविलें।
याचे करी जो जें म्हणितलें। हाकारिजे पुंडलिक। १।
धन्य धन्य धरातळीं। वोळले वोळले वनमाळी।
वैष्णवीं पिटिली टाळी। जयजय शब्दें करुनियां। २।
गरूडासी सांगे केशव। कैसा भेटे ज्ञानदेव।
पुंडलिकासी जाउनी सर्व। वृत्तांत सांगे येथींचा। ३।
तेणें नमस्कारूनि हरी। निघाला पक्षाच्या फडत्कारीं।
भेटला पुंडलिका झडकरी। यथाविधीनें सांगितलें। ४।
पुंडलिक विस्मित चित्तीं। म्हणे धन्यधन्य ज्ञानमूर्ती।
ज्या कारणें वैकुंठपती। अलंकापुरीस गेले। ५।
धन्यधन्य विठोबाचे चरण। धन्यधन्य माझे नयन।
धन्य नामा रूपी संपन्न। विष्णुभक्त सखा माझा। ६।
मग गरूडासी पुसिलें। ज्ञानदेवा हाकारिलें।
दिव्य विमानीं बैसविलें। चला म्हणितलें अलंकापुरीसी। ७।
नामा असे खेद करीत। केशव तयासी संबोखित।
तुम्हां दोघांचा एकांत। माझेनि संगें पुरेल। ८।

३७४. पुढें चालिला गरूड। आक्रमित अवघें ब्रह्मांड।
मागें विमान शुभ्र प्रचंड। पुंडलिक आणितसे। १।
धन्य हरिभक्तांचा मेळ। धन्य धन्य तो गोपाळ।
धन्य धन्य अलंकापुरी सुढाळ। ज्ञानदेव येतसे। २।
दुरोनि लक्षित रूक्मिणी। हरूषें सांगे चक्रपाणि।
पैल विमान येतसे गगनीं। दाखविजे नामया। ३।

मग नामयासी सावध । करूनियां तो गोविंद।
म्हणे तुझा पुरविला रे छंद । पैल ज्ञानदेव येताहे । ४ ।
नेत्र विकसित पाहे । तंव गगनीं विमान दिसताहे ।
पुंडलिक गरूड आहे । दिव्य देही विमानीं । ५ ।
ऐसा जंव तटस्थ घटिका। तंव उतरलें निमिष्य एका ।
नामा पावला संतोषा। ज्ञानदेवा देखोनी । ६ ।
विमान घंटि गर्जत । नामा पुढारा चालत।
जीजी रुक्मिणी म्हणत । वेगु कीजे ज्ञानदेवा । ७ ।
नामा ज्ञानदेव भेटले । पुंडलीकें विष्णु नमस्कारिले ।
भक्तीं जयजय शब्द केले । देवीं पुष्पवृष्टि केलिया । ८ ।

३७५. आलिंगन पडिलें दृढ । मिठी न सुटे पडिलें गूढ ।
पुंडलिक म्हणे मज चाड । या विठ्ठल चरणाची । १ ।
तुझे दरूषनें माझा लाभ । जैसा ज्ञानदेवावरी लोभ ।
नामयावरी स्वयंभ । तैसाचि करीं विठ्ठला। २ ।
नामदेवा अलिंगिलें प्रीतीं । शिर चरणावरी अवचितीं ।
ज्ञानदेवाच्या ठेवी पुढती । म्हणे धन्य क्षितीं मी एक। ३ ।
पुंडलिक म्हणे नामया । धन्यधन्य तुझा थाया ।
क्षिती आणिले वैकुंठराया । ज्ञानदेवाचेनि स्मरणें । ४ ।
धन्य युगानयुगीं तुम्ही । धन्य देखिलें तीं आम्ही ।
धन्य अलंकापुर जन्मीं । उपजोनी जो देखेल। ५ ।
पंढरीहुनी हें मूळपीठ । जुनाट पैं वैकुंठ ।
पूर्वीं येथें होते नीळकंठ । ब्रह्मा विष्णू रूद्र इंद्र । ६ ।
तें हें शिवक्षेत्र प्रत्यक्ष । पूर्वे मातुलिंग साक्ष ।
तेथेंही केशव प्रत्यक्ष । चतुर्भुज रूपें असे । ७ ।

दक्षिणे पुण्येश्वर देवो । पुण्यस्थळ महादेवो ।
मूळपीठीं नागेंद्री पहावो । त्रिवेणीरूपें वाहातसे । ८ ।
पश्चिमे इंदुरिये देवो । ब्रह्मेश्वर उत्तम ठावो ।
उत्तरे सिद्धेश्वर देवो । खेटक ग्रामीं भागीरथी । ९ ।
मध्यस्थळीं हे इंद्रायणी । सरसी भागीरथी वाहिनी ।
सिद्धेश्वर शोभे स्थानीं । ज्ञानदेवो सहित । १० ।
ऐसिये दक्षिण वाहिनीसी । स्नान घडतां अहर्निशीं ।
कोटि तीर्थें प्रयाग काशी । प्रसन्न होती हरिहर । ११ ।
ऐशी ये तीर्थीं देवा । समाधि दिधली ज्ञानदेवा ।
पुंडलिक विनवितसे केशवा । धन्य भाग्य नामयाचें । १२ ।

३७६. स्वर्ग मृत्यु पाताळ तिन्ही ताळें । उदर विराटलें थोर विश्वरूप । १ ।
समाधि संजीवन निवृत्ति फावलें । तें निधान देखिलें आम्हीं तुम्हीं । २ ।
निवृत्ति सोपान ज्ञानदेव निधी । मुक्ताई सिद्धि अलंकापुरीं । ३ ।
पंढरी प्रत्यक्ष केली ज्ञानदेवें । उभारूनि बाहे सांगे आम्हां । ४ ।
कळिकाळासी त्रास विठ्ठल उच्चारीं । हरि चराचरीं भरला दिसे । ५ ।
सर्वत्र सबाह्य अंतरंग रूपडें । तें रूप फाडोवाडे पारखिलें । ६ ।
चिंतामणीचें सार कल्पतरू उघडें । दावूनियां मूढां तारियलें । ७ ।
सुवर्णाचा पिंपळ तिही केला ठाउका । त्या समीप देखा कल्पतरू । ८ ।
सिद्धेश्वरलिंगीं सिद्धिबुद्धि दाता । जड जीवा मुक्तता देतु हरी । ९ ।
ऐशीये स्थानी ज्ञानदेव राहिले । राहुनी तारिलें मूढजनां । १० ।
नामा म्हणे ज्ञानदेव हा दातार । जड जीवा उद्धार विठ्ठलहरी । ११ ।

३७७. तंव तेथें नवल वर्तले । आकाश असे विमानीं दाटलें ।
म्हणती मूळपीठ वैकुंठ देखिलें । पुंडलिका सकट । १ ।
पंढरीहुनि आलें कैसें । पुंडलिक देव सरसे ।
ज्ञानदेवासवें नामा असे । आणि विष्णुभक्त अपार । २ ।

